रंगभूमीवर 'घनःशाम' म्हणून गाजलेले,
पण व्यवहारांत 'धुंडीराज' ठरलेले,
माझे नाट्यगुरु
श्री. चिंतामणराव कोल्हटकर यांना
प्रेमादरपूर्वक अर्पण

— पुरुषोत्तम

## ऋणनिर्देश

ह्या नाटकाची कल्पना मला मॉमच्या ‘ शेपी ’ ह्या नाटकावरून सुचली. परंतु हें शेपीचें भाषांतर किंवा रूपांतर मात्र नाहीं. मॉमचा नायक शेपी ज्या परिस्थितींत सांपडला, तशाच परिस्थितींत आमच्या इथला ‘ शिदबा ’ जर सांपडला असता, तर तो कसा वागला असता ह्याचें जें चित्र माझ्या कल्पनेनें रेखाटलें, त्यांतून ह्या नाटकाचा जन्म झाला. एका अत्यंत चांगल्या कलाकृतीचीं आपल्या मनःपटावर उमटलेलीं भावचित्रें आणि स्वतःवर आजवर झालेले अन्य संस्कार ह्यांच्या मिश्रणांतून नवीन कलाकृति निर्माण करण्याचा हा प्रयत्न आहे. त्याचें यशापयश महाराष्ट्रांतील चोखंदळ रसिक माझ्या पदरांत टाकतीलच; तथापि ज्यांनीं हें नाटक रंगभूमीवर आणण्याचें धाडस केलें त्यांपैकीं प्रथम मुंबई मराठी साहित्य संघ आणि डॉ. अ. ना. भालेराव ह्यांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. हें नाटक प्रयोगरूपानें रंगभूमीवर आणण्यासाठीं, नाट्यसृष्टींत वयाची साठी उलटली तरी तरुणाच्या उत्साहानें अजून राबणारे गुरुवर्य चिंतामणराव कोल्हटकर यांनीं जे परिश्रम घेतले त्याबद्दलचें ऋण शब्दांनीं फिटणार नाहीं. मुंबई मराठी साहित्य संघातर्फें होणाऱ्या नाट्योत्सवांतील या नाटकाच्या प्रयोगांत भाग घेणाऱ्या सर्वांचा मी आभारी आहें.

हें नाटक लिहावयाला सुरुवात करण्यापूर्वी स्थूलमानानें यांच्या आराखड्याची चर्चा करण्यांत आपल्या चिकित्सक रसिकतेचा लाभ

देणारे माझे स्नेही प्रा. अ. के. भागवत, आणि नाटक लिहून झाल्यावर प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारावयास आनंदानें तयार झालेले माझे स्नेही श्री. अनंतराव कुलकर्णी ( कॉंटिनेंटल् प्रकाशन ) ह्यांचा मी अत्यंत आभारी आहें.

ह्या नाटकांतील " नादांत गुंगसी जे " ही कविता श्री. बा. भ. बोरकर यांची आहे आणि बाकीच्या दोन कविता श्री. ग. दि. माडगुळकर यांच्या आहेत. या दोघांचेहि मी आभार मानणार नाहीं, कारण त्यांच्या कवितांवर माझा आपुलकीचा हक्क आहे.

हा आवडीच्या ऋणाचा उल्लेख संपविण्यापूर्वी ह्या नाटकाचे प्रयोग करूं इच्छिणाऱ्यांना एक नम्र विनंति आहे. माझ्या यापूर्वीच्या 'अमलदार' ह्या नाटकाचे कित्येक ठिकाणीं माझी परवानगी घेतल्याशिवाय प्रयोग होत असल्याचें माझ्या निदर्शनास आलें आहे. असा प्रयोग करणें हें बेकायदेशीर तर आहेच, शिवाय तें लेखकावर अन्याय करण्यासारखें आहे. ज्याचें नाटक आपण करतों त्याला कळविण्याची सुद्धां आवश्यकता वाटूं नये हें कांहीं फारसा सुसंस्कृतपणाचें लक्षण नाहीं. या नाटकाच्या बाबतींतहि तसेंच होऊं नये ही इच्छा ! शिवाय ह्या नाटकाच्या, एकोणीसशें त्रेपन्न साल अखेरपर्यंतच्या प्रयोगांचे हक्क मुंबई मराठी साहित्य संघाकडे आहेत. त्यामुळें इतर कुणालाहि तोंपर्यंत ह्याचे प्रयोग करण्याची परवानगी नाहीं. त्यानंतर माझ्या लेखी परवानगीशिवाय ह्या नाटकाचे खाजगी अगर जाहीर प्रयोग करतां येणार नाहींत.

त्र्यंबक सदन, अजमल रोड,<br>विलेपारलें, मुंबई २४.

—पु. ल. देशपांडे.

# अंक पहिला

[ शिदबा रद्दीवाल्याचें बिऱ्हाड.

पुण्यांतल्या भवानी किंवा गंजसारख्या पेठेंतल्या गरीब वस्तींतील एका चाळींतलें दोन खोल्यांचें बिऱ्हाड. मागली खोली हें स्वयंपाकघर, व पुढली खोली, दिवाणखाना, बेडरूम वगैरे सर्व कांहीं. पुढल्या खोलींत खूप रद्दी साठवून ठेवली आहे. खोलीच्या मधेंच भिंतीला लावून एक रुंद चौपाई आहे. त्या चौपाईच्या उजव्या बाजूला आंतल्या खोलींत जावयाचें दार.

भिंतीवर गांधी, नेहरू वगैरे पुढाऱ्यांचे फोटो आहेत. दिवाळी अंकांतील कांहीं रंगीत चित्रें भिंतीला नुसतीच चिकटवलीं आहेत. डाव्या बाजूच्या भिंतीजवळ एक टेबल व खुर्ची. त्या टेबलावरच एक पुस्तकांचा स्टँड. खूप पुस्तकें आहेत. त्या भिंतीवर शिदबा रद्दी-वाल्याची एकुलती एक मुलगी सरस्वती हिचें सेकंड इयर ट्रेन्ड व व्हर्नाक्युलर फायनलचें सर्टिफिकेट लावलेलें आहे. मधल्या भिंतीवर एका मराठमोळया पोशाखांतील तरुण स्त्रीची फोटोवरून एन्लार्ज केलेली व पेस्टलनें रंगविलेली तसबीर; तसबिरीला हार घातलेला आहे.

मधल्या भिंतीवरच परंतु उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत एक विठ्ठल-रखुमाईची तसबीर, त्या तसबिरीपुढें नीरांजन, उदबत्ती वगैरे ठेवण्यासाठीं लावलेली छोटी फळी. नाटकाचे सुरवातीला पुढल्या खोलींत कोणीच नाहीं—दुपारची वेळ आहे. आंतल्या खोलींत सरस्वती आहे—ती नॅपकिनला हात पुसत बाहेर येते—टेबलावरचा उत्तरपत्रिकांचा गठ्ठा घेते आणि चौपाईवर बसून उत्तरपत्रिका तपासूं लागते. उत्तरें वाचतांना मधून मधून तिला गंमतीचीं उत्तरें वाचून हंसूं येतें—मधूनच कपाळाला आंठ्या पडतात. बाहेरून संभाची हांक ऐकूं येते. 'शिदबा—शिदबा ऽ ऽ' ]

**सरस्वती** : —कोण आहे ?—

**संभा** : —( बाहेरूनच ) मी—

**सरस्वती** : —( उत्तरपत्रिकांचा गठ्ठा बाजूला ठेवीत )—थांबा हं, आलें—

**संभा** : ( बाहेरूनच ) काय जेवण चाललंय काय ?

**सरस्वती** : नाहीं. आलें— ( कडी काढते. )

[ संभा चिकीवाला येतो. मुंडीछाट पैरण आणि धोतर—डोक्याला टोपी वगैरे कांहीं नाहीं—शेजारच्याच खोलींत रहात असल्यामुळें पायांत वहाणाहि नाहींत. वय चाळीस ते पन्नास ह्याच्या दरम्यान. ]

**संभा** : नमस्कार मास्तरीणबाई—( चौपाईवर बसत ) बा आला न्हाइ का तुझा अजून—

**सरस्वती** : नाहीं आले अजून—

**संभा** : आनि तूं घरींच आज—साळा बंद काय—

**सरस्वती** : होय—आज मातृदिनाची सुटी आहे—

**संभा** : काय म्हनालीस ?

**सरस्वती** : मातृदिन—( उत्तरपत्रिका घेऊन तपासूं लागते. )

**संभा** : म्हंजे ?—पानाचं घे इकडं—( सरस्वती पत्रिका ठेवून आंत जाते व पानाचा डबा घेऊन येते. )

**सरस्वती** : मातृदिन आहे आज—

**संभा** : हें काय असतं आनी ऽ ?—चुना सुकलाय ग—पानी आन थोडं—न्हाइतर तूं बस तुज काम करीत, मी आनतों—

**सरस्वती** : बसा तुम्ही, मी आणतें—( आंतल्या खोलींत जाते. )

**संभा** : सुपारी घिऊन ये चांगलीशी—ह्यांतली किडकी निगाली—

**सरस्वती** : हो आणतें—( सरस्वती पाणी चुन्याच्या डबींत ओतते, सुपारी देते ).

**संभा** : ( पानाच्या शिरा काढीत ) तुझी आपली साळंतली नोकरी झाक् बग ! कामापक्षी सुट्याच जास्त—

**सरस्वती** : ( खुर्चीवर बसते. पुन्हां मांडीवर उत्तरपत्रिकांचा गठ्ठा घेऊन तपासीत ) तर ! आमच्या सुट्या तुमच्या डोळ्यांत येतात ? दोन दिवस पोरं हाकून दाखवा—मेटाकुटीला येईल जीव !

**संभा** : अग माझं बी गिऱ्हाइक पोरांचंच असत कीं—तुज्या साळंम्होरं संभरदा चिकी इकाय हुबा असतो कीं मी—खरं तर तूं वळक दिकून दावीत न्हाइस साळत असतानी—

**सरस्वती** : इश्श—ओळख न दाखवायला काय झालं—तुमचं आपलं कांहीं-तरीच काका—

**संभा** : बाकी बराबर हाय म्हना—कसं झालं तरी तूं थितं मास्तरीनबाई—चिकीवाल्याची वळक दाकवायची मंजी जरा पोजीशन बादच होती—

**सरस्वती** : तर ! आणि माझे बाबा काय असे सरकारी अमलदार लागून राहिले आहेत !

**संभा** : हा— त्ये बी खरंच म्हना— तूजा बा रद्दीवाला आन् तुजा काका चिक्कीवाला—अरीच्या—तुज्या बाचं चित् जाग्यावर न्हाई काय आतांशीं—

**सरस्वती** : काय झालं ?

**संभा** : तमाकू संपली ह्यांतली–

**सरस्वती** : बाबा तंबाखू खात नाहींत हल्लीं–

**संभा** : त्ये बरं !

**सरस्वती** : मला तंबाखू खाऊन पिचीपिची थुंकलेलें नाहीं आवडत–

**संभा** : मास्तरीन सोबतेस खरी–

**सरस्वती** : तुम्हांला माहीत नाहीं काका–तंबाखूमध्यें निकोटीन नांवाचं विष असतं–तंबाखू आरोग्याला फार विघातक आहे–

**संभा** : अग चल ! उगी छापलेल्या भार्षेत बोललीस मंजी तमाकू वाइट ठरतो होय ! –न्हाई त्यो शानपना–परवां सा लंबरच्या साळंम्होरं चिकी इकत होतो–कोन विनिसपेटर आला साळा तपासायला–आन् त्यो जोशी हेडमास्तर हाय का टरक्या डोळ्याचा ? त्येला म्हंगाला– साळच्या म्होरं चिकीवाल्याला चिकी अिकायची परवानगी देऊं नगा–चिकीनं पोरांचीं पोटं बिगडत्यात–त्यो जोशी मास्तर दोसदार आपला–त्येनं दुपारच्या चाला विनिसपेट्राला माजीच चिकी खाऊ घातली–आनि सांगायची गोष्ट मंजी– विनिसपेटर जातांना पाव रत्तल गुडदानी घेऊन ग्येला– पट्टेवाल्याला धाडून ! ! पैसं न्हाइ दिलं–खरं सांगायची गोष्ट मंजी बाहेरच्या भपक्यावर जग ! ! त्यो नानाच्या पेठतला उस्मान बेक्रीवाला–माजीच चिक्की हिरव्या-पिवळ्या कागदांत बांधतो आन् टाफी म्हणून इकतो–अग फारशी न शिंदी लोक मोटारींत बसून खात्यात माजी चिकी आनी बरं का आका–त्यो उस्मान लय उजव्या डोसक्याचा–कागदावर नांव शापलय माजं न त्येचं–उस्मान अँण् संबा कनपेन्शनर–झाली का चिकीची टाफी–

**सरस्वती** : शी शी शी शी शी ! !

**संभा** : का झाल गं ?

**सरस्वती** : काय उत्तरं लिहिलीं आहेत एकेकानं ? पुणें जिल्ह्यांतली फळांची लागवड कुठं होते म्हणून प्रश्न विचारला आठवड्याच्या परीक्षेंत, तर ह्या

चिरंजीवांनीं लिहिलंय–'मंडईत' म्हणून–काय सांगायचं आतां–शुक्रवारीं शिकवलेलें शनिवारीं लक्षांत राहात नाहीं ह्यांच्या–

**संभा :** काय शिकून तरी उजेड पाडनार हाइत पोरं–हे यवढं इद्वानांनीं लिवलेल्या अकलेचं गठ्ठ्या गट्ठ तुजा बा तराजूवर तोलूनच घ्येतो का न्हाई–कांहीं खरं न्हाइ बघ ह्ये–

**सरस्वती :** तर ? जगांत काय विद्वत्ता असेल ती चिकी करण्यांत आणि विकण्यांत–

**संभा :** असं थोडंच म्हनतों मी–बाकी पेप्रं आनि बुकं छापलीं नसतीं तर चिकी बांधायला कागुद तरी कुटून गावला असता म्हना–हीं मानसं इक्तं लिहूनश्यान छापत्यात म्हनूनश्यान तर रद्दी जमते–तुझा बा चार पैसे मिळिवतो–

**सरस्वती :** पैसे मिळवण्याशिवाय तुम्हाला दुसरं काय दिसतंय ?–

**संभा :** आणि पैशाबिगर दुसरं काय मोटं हाय ग दुनियेंत ? तुमी मास्तर लोकांनीं दिकुन पगारवाड करा म्हनूनश्यान गिरनींतल्या मजुरावानी संप क्येला हुताच की–तुजा शिर्पतमास्तरच तर फुडारी होता संपाचा–रद्दींत नांव वाचलं मी त्येचं–

**सरस्वती :** रद्दींत ?

**संभा :** तुज्या बानंच तर दावलं त्येचं नांव आन् फोटु ? आतां जावाय होनार त्यो त्येचा, लयू कौतिकानं दावला त्येचा फोटू रद्दींतनं काढून–

**सरस्वती :** लोकमान्यांत फोटो आणि मुलाखत आली होती त्यांची–

**संभा :** न्हाइ, तसा हुशार हाय त्यो ! त्या दिशीं सनवारवाड्या म्होरल्या सभेंत फाडफाडफाड भाषन सांगत होता अगदीं जवारलाल न्हेरुवानी–

**सरस्वती :** तुम्हीं जसं कांहीं जवाहिरलाल नेहरूंचं भाषण ऐकलंच असेल–

(पेपर्सचा गठ्ठा बांधून–शेल्फवर ठेवते.)

**संभा :** त्येका !– ग्येल्या सालीं झालं न्हाइ का–परसरामभाऊ कालिजाच्या

मैदानावर ?–अकरा रुपयांची चिकी खपली माझी–शिर्पतरावांच्या भासनालाची सा रुपयाची चिकी इकली म्यां–

**सरस्वती** : हेंच तें–भाषण चांगलं कां ? तर तुमची सहा रुपयांची चिकी खपली. अगबाई, आंत डाळ शिजून मेण झालं असेल– ( आंत जाते. )

**संभा** : म्हंजी अजून जेवणखान व्हायचं हाय व्हय ?

( दारावर टक टक ऐकूं येते. संभा दार उघडतो. श्रीपतराव येतो. खादीचें धोतर, नेहरू शर्ट, जाकीट, गांधी टोपी, हा वेष.तिशींतला तरुण. )

**संभा** : जय देवा ! या शिर्पतराव, तुमच्या संबंधांतच बोलत होतों–

**श्रीपत** : सरोज आहे ना घरांत ?

**संभा** : सरोज ? सरोज कोण–

**सरस्वती** : ( आंतून येत– ) अगबाई मला वाटलं बाबा आले–

**श्रीपत** : सरोज आज संध्याकाळीं–शिक्षकांच्या सभेंत भाषण आहे माझं–

**संभा** : कुटं हाय सबा ?

**सरस्वती** : झालं !–त्यांना जागा सांगा अगोदर ! विषय सांगितला नाहीं तरी चालेल–

**श्रीपत** : म्हणजे ?

**सरस्वती** : त्यांच्यामतें जवाहिरलाल नेहरूंच्या खालोखाल तुमचा नंबर आहे–

**श्रीपत** : तो कसा ?

**सरस्वती** : म्हणजे असं–नेहरूंच्या सभेला अकरा रुपयांची चिकी खपली होती ह्यांची आणि तुमच्या सभेला सहा रुपयांची–

**श्रीपत** : असं असं–पण सहा आणि अकरा रुपयांच्यामध्यें खूप पुढारी असतील कीं–

**संभा** : पोत्यांनीं !–अब फुडाऱ्यांना काय तोटा ! पन तुमच्या सबेला यायला न्हाइ गावायचं आज–

**श्रीपत** : कां ? कोणी सात रुपयेवाला पुढारी येणार आहे काय ?

**संभा** : फुडारी नाहीं–नवा शिनेमा येतोय मिनर्व्हाला. थितं तुमच्याच काय न्हेरूच्या सबच्या दुप्पटींत चिकी खपती–

**श्रीपत** : अस्सं ! एकूण आपलं पुढारी-सभा ह्या बाबतींतलं धोरण मोठं छान आहे !

**संभा** : आतां रागावनार नसला तर खरं सांगतों–गेल्या सालीं त्यो कोन तुमचा असाच योक फुडारी जीव जाईतोंवर उपास कराया बसला होता–त्येला पगाया जत्रा जमत होती मानसाची–

**श्रीपत** : बरं मग–

**संभा** : लोक डोळ पुसत भाईर पडायचे आनि जातांना चिकी घेऊन खात जायाचे !

**श्रीपत** : उपास करणारा पुढारी चिका मागवत नव्हताना तुमची ?

**संभा** : आतां खरं सांगू–चिकी घेत नव्हता–पर आमच्या अन्ना पुनेकराची भेळ नेत होता रातीची–कांदा मातर घालूं नका म्हनून बजावून–

**श्रीपत** : मारा थापा !

**संभा** : न्हायलं ! शिर्पतराव, दाकवायचं दात वायले आन् खायाचे वायले असत्यात–

**श्रीपत** : कबूल !–बरं मग सरोज–

**संभा** : सरोज ? तुजं नांव सरोज कवा झालं ग सरस्वती–

**सरस्वती** : ह्यांना तें जुनं नांव आवडत नाहीं–हे मला सरोजच म्हणतात–

**संभा** : हा म्हंजी चिक्कीची टाफी ! !

**श्रीपत** : काय ?

( सरस्वती रागावून संभाकडे पहाते. )

**संभा** : पन शिर्पतराव–यकाद्या पोरीचं नांव बदलायचं मंजी काळी पोत बांदून–हिरवा चुडा घालून–बाशिंग बांदून–

**सरस्वती** : चला ! ! ( लाजून आंत पळते. )

**संभा** : काहो शिर्पतराव, काय चुकलं काय. आमचं ?

**श्रीपत** : नाहीं बरोबर आहे ! बाबा कुठं बाहेर गेले आहेत काय ?

**संभा** : खर तर यायचा वकुत टळून गेला त्येचा—कुठं ग्येला म्हातारा काय कीं—आज गावला असल मोटा लग्गा !

**श्रीपत** : सरोज—

**सरस्वती** : ( दारांतूनच ) काय ?

**श्रीपत** : बाबा रोज किती वाजतां येतात ?

**सरस्वती** : एव्हांना जेवून परत देखील जातात—

**श्रीपत** : बाकी म्हातारपणांत त्यांनीं हा रद्दीसाठीं दारोदार फिरायचा धंदा बदलून दुसरा बैठा धंदा करायला पाहिजे नाहीं ?

**संभा** : आतां म्हातारपनांत दुसरा कुठला धंदा करनार ?

**श्रीपत** : कां ? रद्दी घेण्याविकण्याशिवाय धंदा नाहीं दुसरा ? हे काय आपलं दारोदार भिकाऱ्यासारखं रद्दी देतां का जीऽऽम्हणून ओरडत जायचं—

**संभा** : हां हां ! म्हंजे दारोदार भिकाऱ्यासारखं वरडनं तुमाला पसंत न्हाई—म्यां म्हनलं काय म्हातारपनांत हिंडाफिरायचं आवघड होत म्हनुनश्यान म्हनताय—

**सरस्वती** : मी तर बाबांना म्हणत होतें तुम्ही आतां धंदाच बंद करा—

**संभा** : त्ये इसर ! आज तीस वर्स तुज्या बाला वळकतोय मी. तो न् मी संगसंगं आलों ह्या पुन्यांत—गेल्या इक्त्या वर्सांत योक दीस बसून खाल्लं नसेल त्येनं.

**श्रीपत** : पण आतां त्यांची मुलगीच कमावते आहे ना—कुणा परक्याच्या जिवावर जगतोय असं वाटायला नको—

**संभा** : त्ये झालं—पर आतां तुमचं लगीन झालं—मंजी मग ?

**सरस्वती** : इश्श !

## अंक पहिला

**संभा** : आतां ! अग घरांतली योक गोष्ट माज्यापासनं दडवीत न्हाइ तुजा बा. त्येनं समदं सांगितल्या मला–तुजी आइ हुती–तिला तुजा मामा म्हायेर-पनाला बलावनं कराय आला मंजी तुजा बा मला इचारायचा–संबा कसं करायचं–तुज्या वयनीला धाडूं या काय तिच्या म्हायेराला चार दीस–मंग मी सांगायचा जाऊं दे–काय व्हत त्येला–माजी वयनी म्हायेराला ग्येली म्हनुन का झालं–तुजी वयनी करून घालील तुला चार दीस–मंजी माजी कारबारीन–मंजी तुज्या बाची वयनीच न्हाइ का ? पर न्हाई ! म्हातारा आपल्या हातानं करून खानार खरं दुसऱ्याकड न्हाई जानार ! मी मात्तुर धां डाव येऊन तुझ्या आईकडनं हक्कानं भाकरटुकडा मागून खायाचा–( तसबिरीकडे पाहून ) वयनेऽऽ यवड लेकीच लगीन बगुन न्हाई जायाच ?–आज फुलाची माळ घातलीस आइच्या फोटुला–का तीथबीत हाय काय आज तिची–

**सरस्वती** : इश्श कितीदां सांगितलं तुम्हांला–अहो–आज मातृदिन आहे–आईच्या आठवणीचा दिवस–ज्यांची आई आहे ते आणि नाहीं ते सुद्धां हा दिवस पाळतात–सकाळीं ह्यांचं आईवर भाषण झालं–

**संभा** : आईवर भासन ?

**सरस्वती** : हो ! म्हणजे आईचं महात्म्य सांगितलं ह्यांनीं–

**संभा** : अर देवा–आईचं म्हात्म्य बी सांगाय लागत काय आताशा–

**सरस्वती** : कवितासुद्धां केली आहे ह्यांनीं आईवर–

**संभा** : म्हना तरी म्हातारा येईस्तोवर–

**श्रीपत** : तुम्हाला कळणार नाहीं ती–

**संभा** : का ? इंग्रजी हाय ?

**श्रीपत** : नाहीं मराठींतच आहे !

**संभा** : मग मराठी कळत कीं मला–

**सरस्वती** : म्हणा की–म्हणा ना–

**श्रीपत** : ( खिशांतून कागद काढतो. )

संभा : म्हना ( पुन्हां पान जमवूं लागतो. )

श्रीपत :

प्रळयाच्या प्रचंड गर्जना
शांत झाल्या ...
सागराच्या गभीर तळांत ...
कमल्याश्या वेदना
गूढ वेदना, गोड वेदना
कुठें तरी आंत आंत
सप्त सागराच्या तळांत
आकाशाच्या कानांत
वायू कुजबुजला
पहिल्या सूर्यकिरणांनीं
पाकळ्यांवर ओठ टेकतां टेकतां सांगितलेलं
पृथ्वीचं गोड गुपित ! !
गर्भवती पृथ्वी
गंधवती पृथ्वी
रंगवती पृथ्वी ... रसवती पृथ्वी ! !
हिरव्याचे डोहाळे–
सुगंध सुटला मातीला
काळ्याशार वदनावर
गर्भकांती–नवी तकाकी
नवा तजेला–नवी लकाकी
क्षितिजाच्या उंबरठ्यावर
लालदूत लालदूत
अक्षांशाचा विळा
रेखांशाचा हातोडा हातांत–
इंद्रधनुष्याची तुतारी फुंकून सांगणार
पृथ्वी माता झाली–पृथ्वी माता झाली
मातेचा विजय असो ...

## अंक पहिला

**सरस्वती** : आहाहा ...

**संभा** : काऽऽही कळलं न्हाइ ! तुम्ही हें असलं कांहीं लिवतां आनि ही रद्दी वाढत जाति—आम्ही साळंत असतानीं आइचं गानं म्हनत होतों—थोर तुझे उपकार आई थोर तुझे उपकार—खरंच शिर्पतराव लय सबुद ठाऊक हाइत तुमास्नी—मी अडलोय एका सब्दावर—सांगतां काय ?

**श्रीपती** : कसला शब्द ?

**संभा** : थांबा—( नेहरू शर्टाच्या खिशांतून एक कागद काढतो. ) ह्यें बघा ( अडखळत वाचतो. ) बहुतेक तरून, युवतींचे—युवतींचे मंजी तरन्या पोरींचं न्हाइ का ?

**श्रीपत** : होय—

**संभा** – बहुतेक तरून, युवतींचे हे चोरन्याचा प्रयत्न करतात—आतां हित दोन सबुद बसत्यात—वित्त आनि चित्त—वित्त मंजी पैसा न्हव काय ? अन्ना भेळवाल्यानं सांगितलं मला-आतां सांगा हितं काय सबुद घालू ? तरन्या पोरीच्या वित्तावर डोळा असतो की चित्तावर ? आनी चित्त चोरायच मंजी कसं ?

**सरस्वती** : सांगा की—

**श्रीपत** : तूंच सांग—

**सरस्वती** : मला वाटतं वित्त चोरण्याचा हेंच बरोबर आहे—

**श्रीपती** : अस्सं ! म्हणजे तूं श्रीमंत आहेस म्हणून मीं तुझ्यावर प्रेम केलं वाटतं—तरी बरं—

**सरस्वती** : हं—म्हणा—रद्दीवाल्याची मुलगी—

**श्रीपत** : असं नाहीं सरोज—पण चित्तच बरोबर आहे—

**संभा** : न्हाई पटत ! अत्र समद्यांचा डोळा पैशावर असतु.

**श्रीपत** : म्हणजे मी हिच्याशीं लग्न करणार आहे ते काय पैशावर डोळा ठेवून—

**संभा** : तसं न्हाइ खरं–पर न्हाइ तरी आयती कमावती बाइलच गाठली न्हाइ का तुमी–

**सरस्वती** : तुम्हाला काय कळणार काका ? नेहरूंसारख्यांचा मोठेपणा देखील चिकीच्या विक्रीवर मोजतां तुम्ही–

**श्रीपत** : आणि खरं सांगूं का तुम्हाला–हीं कोडीं बिडीं सोडवायचं व्यसन वाईटच ! ! जुगारच हा !

**संभा** : ते राहूं द्या ! परवां तुज्या बाला दिखील बळं बळं मी कोडं सोडवून पाठवाया लावलं–म्हटलं लागला लग्गा तर पोरीच्या लग्नाचा पैसा तरी गावल–

**श्रीपत** : आमच्या लग्नाला खर्च कसला येणार ? आणि मला दुसऱ्याची एक पै सुद्धां नको आहे.

**सरस्वती** : सगळ्यांकडेच तुमच्या स्वार्थी दृष्टींतून पाहू नका तुम्ही काका– शिक्षकांच्या संपाच्या वेळीं उपाशी पोटीं दिवस काढले आहेत ह्यांनीं–

**संभा** : त्ये का–शिद्यानं ईस रुपाय देतानी म्यां बागितलंय–

**श्रीपत** : ते परत करणार आहे मी !

**संभा** : आनि शिद्या ते परत घेनार हाय व्हय ! सोडा ! !

**श्रीपत** : कां नाहीं घेणार ?

**संभा** : अहो घरजावई म्हंजे ल्येकासारा–

**श्रीपत** : कोण घरजांवई ?

**संभा** : म्हनुजे ? म्हातारपनांत बाला सोडून जानार काय ग तूं–

**श्रीपत** : मग–मी इथं येऊन राहूं काय सुनेसारखा ?

**संभा** : ल्येकासारख न्हावा–

**श्रीपत** : असलं ऐतखाऊ फुकट जिणं नको आहे मला–

**संभा** : अहो फुकट कोन खायाला घालनार तुमाला ? हितनं साळला

जायाचा रस्ता न्हाइ का काय ? बर तुमच्याबी घरीं कोन न्हाई–थतं खोलींत यकटं न्हायाच त्ये हतं या–

**श्रीपत :** तें शक्य नाहीं–त्यांना येऊ दे पाहिजे तर माझ्या घरीं–

**संभा :** त्ये इसरा ! !

**सरस्वती :** पण तुम्ही कशाला भांडताय काका–काय करायचं तें आम्हीं पाहूं–परक्या माणसांनीं लुडबुड करायचं कांहीं कारण नाहीं–

**संभा :** परका ?–तुज्या बानं मला तुला परका म्हनताना ऐकलं आसतं–तर येक भडकावली असती तोंडांत–परका म्हने–आजारी झालों तवा धंदा सोडून दोन म्हयने बसला होता माज्या उशाशीं–जातो !

( किंचित् दुखावल्यासारखा जातो. श्रीपत दार लावून घेतो. )

**श्रीपत :** भलताच चिकट दिसतो हा चिकीवाला ! ! काय तत्त्वज्ञान त्याचं, काय अक्कल ! कसं होणार आपल्या देशाचं कांहीं कळत नाहीं–

**सरस्वती :** झालं–देशाची चिंता झाली का सुरू ? कधीं खोलीवर भेटायला यावं तुम्हांला तर शिक्षकांचा प्रश्न–महागाईभत्ता–संप–जनतेचा उठाव ह्यांत असतां–

**श्रीपत :** मग काय बोलूं ? गुलाबाचीं फुलं–उषेचे आरक्त कपोल–नेत्रांचे शर–

**सरस्वती :** इश्श. असं नाहीं मी सांगत–पण उद्यां लग्न झालं आपलं म्हणजे चोवीस तास राजकारणाच्या चर्चा करतिच बसायचं कीं काय आपण ?

**श्रीपत :** छे छे–तुझ्या पायाशीं बसेन–आणि सारखा म्हणत राहीन–हृदयेश्वरी, भक्तावर अनुग्रह होईल का ? –प्राणवल्लभे, युगायुगांची प्रतीक्षा आज सफल झाली आहे–

**सरस्वती :** काय हरकत आहे कधीं तरी असं बोलायला–

**श्रीपत :** हरकत कांहीं नाहीं–

**सरस्वती :** खरंच नाहीं–परमेश्वरानं एवढी प्रतिभा दिली आहे तुम्हांला–

व्याख्यानाला उभे राहिलांत म्हणजे जिवाचा कान करून लोक ऐकत असतात–पुष्कळदां मला भीति वाटते–

**श्रीपत** : कसली ?

**सरस्वती** : वाटतं एवढ्या मोठ्या माणसाची बायको म्हणून घ्यायची लायकी तरी आहे का माझी–

**श्रीपत** : एवढा मोटा ! कोण मी ! अग शिक्षक संघाचा साधा चिटणीस मी ! तसं पाहिलं तर जवळजवळ सारखाच पगार आणि सारखाच महागाई भत्ता मिळविणारीं मुकीं बिचारीं कुणी हाका अशीं मास्तरमंडळी आपण–

**सरस्वती** : चला ! मला तर बाई वाटायला लागलंय कीं हळूहळू पुढारी होत चालला आहांत तुम्ही. उद्यां निवडणुकीला उभे रहाल आणि निवडून आलांत तर मंत्रीसुद्धां व्हाल एखाद दिवशीं–

**श्रीपत** : साखर पडो तुझ्या तोंडांत !

**सरस्वती** : म्हणजे ?

**श्रीपत** : तेंच तर खरं सांगायला आलों होतों मी तुला ! कालच रात्रीं आमच्या पेठेंतले लोक मला भेटायला आले होते–

**सरस्वती** : कशाला ?

**श्रीपत** : त्यांचं म्हणणं मीं निवडणुकीला उभं रहावं–

**सरस्वती** : मग रहा की–खरंच रहा–

**श्रीपत** : आणि पैसे कुठून आणूं ?

**सरवती** : पैसे ?

**श्रीपत** : मग निवडणुका काय पैशाशिवाय होतात ?

**सरस्वती** : तुम्ही नुसते सभेत बोललांत कीं लोकांचीं मनं आपलींशीं करून घ्याल !

**श्रीपत** : मनं आपलींशीं करून घेईन कदाचित् पण मतं मात्र आपलींशीं करायला पैसे लागतात, सरोज !

**सरस्वती** : किती पैसे लागतील ?

**श्रीपत** : तीनचार हजार तरी हवेत !

**सरस्वती** : अगबाई इतके ?

**श्रीपत** : काय करणार– ह्या भांडवलशाही समाजरचनेंत–

**सरस्वती** : हां– हां– हां इथं भाषण नको–

**श्रीपत** : थट्टा वाटते तुला– पण खरं सांगतों तुला सरोज–वाटतं सर्वस्वावर लाथ मारावी आणि गरिबांच्या उद्धारासाठीं आपलं तनमनधन सर्व कांहीं द्यावं– भोंवतालचं हें अज्ञान– ही गरीबी– ही पिळवणूक अगदीं असह्य होते–

**सरस्वती** : खरं आहे– पण इतके पैसे कुठून उभे करायचे !

**श्रीपत** : तुझे बाबा– मला काय मदत करूं शकतील ?

**सरस्वती** : बाबा काय मदत करणार ! रद्दी विकून काय मिळतं त्यांना असं ?

**श्रीपत** : मग दुसरा कुठला तरी एखादा चांगला धंदा कां नाहीं करीत ते– शी : ! तुझ्यावर माझं जिवापाड प्रेम आहे हें सोड सरोज, पण शिक्षक म्हणजे एक कांहीं तरी समाजांत स्थान असलेली व्यक्ति असते ग ! आपला सासरा रद्दीवाला आहे हें सांगायला तितकंसं बरं वाटत नाहीं– म्हणजे त्यामुळें माझं तुझ्यावरचं प्रेम कमी होतं अशांतला भाग नाहीं– पण रद्दी विकणारा इसम– मी आर्थिक दृष्टीनें विचार करतों असं समजूं नकोस तूं– पण सांस्कृतिक दृष्टीनें विचार कर ! सांस्कृतिक दर्जा काय त्यांचा ? उद्यां समज त्यांनीं मला हजार दोन हजार रुपये दिले. मी निवडून आलों आणि तूं म्हणतेस त्याप्रमाणें कदाचित् मंत्री झालों, तर आपला सासरा रद्दीवाला आहे हें कांहीं सांगायला तितकंसं बरं वाटणार नाहीं ग–

**सरस्वती** : पण त्यांचा आणि तुमचा संबंध येतोय कशाला ? तसंच बघायला गेलं तर उद्यां खूप शिकलेल्या बायकांशीं तुमच्या ओळखी होतील– त्यांच्या तुलनेनं मीहि कदाचित् असंस्कृतच वाटेन तुम्हांला–

**श्रीपत** : तुझा प्रश्न निराळा आहे सरोज! प्रेम ह्या गोष्टी पाहात नाहीं–प्रेम सौंदर्य पाहात नाहीं, पैसा–मान अपमान, दर्जा ह्यांतलं कांहींच पाहात नाहीं म्हणून तर प्रेम आंधळं असतं म्हणतात–

**सरस्वती** : मग त्याच आंधळ्या दृष्टीनं बाबांच्याकडे पहा तुम्ही–

**श्रीपत** : तें कसं शक्य आहे? तुझ्या माझ्यांत प्रेमाचं अलौकिक नातं आहे–

**सरस्वती** : पण बाबांना सुद्धां तुमच्याबद्दल खूप कौतुक वाटतं!

**श्रीपत** : अग पण तें आंधळं कौतुक काय कामाचं? आपल्या पिढींतल्या तरुणांच्या आशा–आकांक्षा, गरीब जनतेबद्दल आपल्याला वाटणारा कळवळा आणि क्रांतिप्रवण मनोभूमिका ही तुझ्या वडलांना कशी कळणार? आत्ता नाहीं तो चिकीवाला गेला?–आज रक्तानं लिहिलेली माझी मातेवरची कविता! त्या गाढवाला थोर तुझे उपकार आठवली–असल्या सांस्कृतिक पातळीवरच्या लोकांना आपलीं जीवनमूल्यं कशीं कळायचीं? आपल्या नव्या निष्ठा कशा उमगायच्या?

**सरस्वती** : खरं सांगूं का–कधीं कधीं तुम्ही काय बोलतां हें मलाहि तितकंसं नीट कळेनासं झालंय! त्यांतून प्राज्ञ कीं कसल्या परीक्षेला बसल्यापासून तर तुम्ही फारच कठीण बोलायला लागलां आहांत–असं वाटतं, मिणमिणत्या ज्योतीनं सूर्यावर प्रेम करायचा हट्ट कां धरावा?

**श्रीपत** : सुंदर! काय उपमा दिलीस! मिणमिणत्या ज्योतीनं सूर्यावर प्रेम करायचं–सुरेख कल्पना–चांगल्या कवीलासुद्धां सुचायची नाहीं असली कल्पना–

**सरस्वती** : असल्या खूप कल्पना उतरून ठेवल्या आहेत मीं माझ्या वहींत! तुमच्यासारख्या कवीशीं संसार करायचा आहे मला–कुठंहि कांहीं वाचतांना सुंदर कल्पना आढळली कीं मी ह्या वहींत उतरून ठेवतें हल्लीं!

(एक छोटीशी वही काढते.)

**श्रीपत** : बघूं–

**सरस्वती** : थट्टा करायची नाहीं हं–(वही देते.)

**श्रीपत** : छे छे–थट्टा कशाला करीन–( वही चाळूं लागतो– ) हे काय ! माझी कविता !– अग ह्या एवढ्या थोर लेखकांच्या पंक्तींत माझी कविता कशाला !

नादांत गुंगसी जें
शब्दांत सांग बाले.

म्हण तरी–

**सरस्वती** : आपली नुकतीच ओळख झाली होती–त्या वेळीं तुम्हीं केली होती ही कविता–तुम्हांला आठवतंय ? दोन नंबरच्या शाळेंतून नुकतीच बदली झाली होती तुमची–बोर्डाच्या ऑफिसांत भेटलों होतों आपण–

**श्रीपत** : हं ! बोर्डाचं तें रुक्ष ऑफिस नंदनवनासारखं वाटलं होतं मला–त्याच दिवशीं पर्मनंट झाल्याचा हुकूम मिळाला होता मला–मी घरीं आलों आणि झरझरझर ओळी उतरल्या गेल्या कागदावर–नादांत गुंगसी जें शब्दांत सांग बाले.

**सरस्वती** : ( गाऊं लागते. )

नादांत गुंगसी जें शब्दांत सांग बाले
आषाढच्या घनें कां त्वन्नेत्र भारलेले
होसी रसार्द्र जेवीं झुकतेस द्राक्षवेली
ओठांत वेदनेची मदिराहि सांठलेली
पायांस अंतराचा कां भार साहवेना
कां बोल घोळलेला ओठांतुनी फुटेना
कां सांवलींत तूझ्या बघतेस बावरून
भलतीच लाज मेली वद गे सखे त्यजून.

( गाण्याचीं दोन कडवीं झाल्यानंतर एकदम कांहीं तरी आठवण झाल्यासारखा उठून श्रीपत बाहेर जातो व गाणें संपतां संपतां परत येतो. )

**सरस्वती** : कुठं गेलां होतां ?

**श्रीपत** : अग बाहेर सायकलला कुलूप लावायला विसरलों होतों. एकदम आठवण झाली.

(दार ढकलून शिदबा येतो. पन्नाशीच्या घरांतला गृहस्थ, भरघोस मिशांमुळें चेहरा उगीचच उग्र वाटतो. पैरणीवर खाकी कोट घातला आहे–धोतर–पायांत जाड वहाणा–कपाळाला पांढरें गंध आणि गळ्यांत तुळशीची माळ आहे. संथ पावलें टाकीत आंत येतो–टोपी कोट काढून खुंटीवर लावूं लागतो. श्रीपत रद्दींतला मासिकाचा एक अंक घेऊन चाळूं लागतो.)

**सरस्वती** : किती उशीर झाला बाबा !

**शिदबा** : अग कोर्टाचीं कामं–तिथं काय आमच्यासाठीं लौकर उरकणार !

**सरस्वती** : कोर्ट ? अगबाई खरंच !– आज तारीख होती नाहीं त्या खट-ल्याची ! काय झालं ?

**शिदबा** : दोन महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली त्याला–

**सरस्वती** : छान झालं !

**शिदबा** : काय छान झालं ?

**सरस्वती** : कां ? दिवसाढवळ्या चोऱ्या करतांना कांहीं लाज वाटली नाहीं त्याला ?

**शिदबा** : वाटलीहि असेल !–आपल्याला काय माहिती !–पांडुरंगा–

**श्रीपत** : कोणी चोरी केली ?

**शिदबा** : श्रीपतराव ! तुम्ही केव्हां आलां–पाहिलंच नाहीं मीं–

**श्रीपत** : आतांच आलों–कसली चोरी होती ?

**शिदबा** : एकाला सायकल चोरतांना पकडून दिला होता मीं–

**श्रीपत** : ठीक झालं ! फार व्हायला लागल्या आहेत हल्लीं सायकलच्या चोऱ्या–फटके मारले पाहिजेत एकेकाला–

**शिदबा** : छे छे–

## अंक पहिला

**श्रीपत :** काय छे छे! काम धंदा करून जगायचा काय धाड झाली आहे ह्या हरामखोरांना–

**शिदबा :** कामधंदा करून देखील भागत नाहीं हल्लीं श्रीपतराव–आमचंच बघाना–आक्का नोकरी करते–मी रद्दीचा धंदा करतों–पण एवढं असून देखील पांच रुपये शिल्लक टाकीन म्हटलं तर होत नाहीं–बरं कसलं व्यसन सुद्धां नाहीं मला–तंबाकू खात होतों–ती सुद्धां आक्कानं बंद केली–

**श्रीपत :** बाकी तंबाखू खाणं मलाहि आवडत नाहीं–मोठं गलिच्छ व्यसन आहे–

**शिदबा :** व्यसनं सगळींच गलिच्छ म्हणा–पण मी तंबाखू बंद करतांना विचार केला–म्हटलं रुपयाभार वाचला महिन्याकांठीं एखाद्या भिकाऱ्याचं पोट भरेल एक दिवस–

**श्रीपत :** छे छे–हें तत्त्वज्ञान मात्र चूक आहे हां–अहो, भिकाऱ्यांना ऐदी बनवतों आपण–

**शिदबा :** अहो माणूस उगाच नाहीं भीक मागत श्रीपतराव–चोर, भिकारी सगळे मला वाटतं भुकेच्या पोटीं होतात–

**श्रीपत :** हें मान्य आहे मला–पण त्याला उपाय म्हणजे जनतेंत संघटना करून दारिद्र्य घालवायला पाहिजे–

**शिदबा :** जा म्हटल्यावर थोडंच जातंय दारिद्र्य! आपलाच एक घास कमी करून भुकेल्याच्या पोटांत घालायला पाहिजे आपण–

**सरस्वती :** भुकेल्याच्या पोटांत मग घास घाला. आधीं तुम्ही जेवून घ्या बघूं–जेवण थंड होतंय–

**शिदबा :** नको–जेवायची इच्छाच नाहीं बघ मला–

**श्रीपत :** कां? पोलिसांनीं पार्टी दिली कीं काय चोर पकडून दिल्याबद्दल–

**शिदबा :** छे छे–मन विटल्यासारखं झालं आज! जन्मांत कधीं कोर्ट पाहिलं नव्हतं–आज बघितलं–उगाच बसून राहिलों होतों एक एक देखावा बघत–

कोणी बायकोचं नाक कापलं–कोणी खिसा कापला–कोणीं पोराला विहिरींत टाकलं–रामरामराम ! आणि आका–एका बाईनं दुधाची बाटली चोरली दुकानांतनं–तान्ह्या पोराला घेऊनच उभी होती पिंजऱ्यांत–पंधरा दिवसांची शिक्षा दिली तिला साहेबानं तर " एवढीच का ? " म्हणाली–

**सरस्वती :** बघा कशा निर्ढावलेल्या असतात त्या–

**शिद्बा :** अग तसं नाहीं आका–तुरुंगांत गेली म्हणजे तिच्या न् पोराच्या जेवणाची सोय झाली–

**श्रीपत :** हट् ! कांहीं तरीच तत्त्वज्ञान आहे हें ! चला जेवून घ्या तुम्ही–

**शिद्बा :** नको–

**श्रीपत :** म्हणजे चोर पकडून दिल्याबद्दल पश्चात्ताप व्हायला लागलाय कीं काय तुम्हांला ?

**शिद्बा :** थोडासा–

**श्रीपत :** नॉन्सेन्स ! ! हें तुमचं आपलं कांहीं तरीच ! अहो हे समाजाचे शत्रु आहेत–

**शिद्बा :** यवढं कुठं ज्ञान कळतं श्रीपतराव मला ? पण अन्नावर इच्छा नाहीं जात आज–पांडुरंगा–

**सरस्वती :** तो इसम शिक्षा झाल्यावर कांहीं बोलला का तुम्हांला–

**शिद्बा :** तर ग–भयंकर बोलला–त्याचे ते तारवटलेले डोळे–तो चेहरा–डोळ्यापुढें नाचतोय माझ्या–चांडाळा, माझी बायको मारलीस–माझ्या एकुलत्या एक लेकराच्या तोंडचा घास काढून घेतलास–असं काय काय बोलला, अगदीं वेड्यासारखं हातवारे करून बोलला–शेवटीं पोलीसांनीं खेचून नेला त्याला–विठ्ठला–पांडुरंगा–

**श्रीपत :** उंः ! मग एवढ्यानं तुम्ही नर्व्हस व्हायचं कांहींच कारण नाहीं–दोन महिन्यांचीच शिक्षा झाली आहे ना त्याला ? तेव्हढ्यांत कांहीं त्याचीं पोरं उपाशी मरत नाहींत–

**शिदबा** : कुणीं सांगावं ! उद्यां मेलीं तर तें पाप परमेश्वराच्या हिशेबीं माझ्या माथ्यावर चढायचं–

**श्रीपत** : तुमच्या कां म्हणून ! दारिद्र्याला समाज जबाबदार आहे–

**शिदबा** : समाज समाज म्हणजे तुम्ही आम्हीच ना श्रीपतराव–छे–रोज एक घास मिळत असेल तर भुकेल्यासाठीं अर्धा काढून ठेवला पाहिजे–

**सरस्वती** : बाबा–यापूर्वीं तुम्हीं कधीं कोर्टात गेलां नव्हतां म्हणून तुम्हांला असं वाटलं–

**श्रीपत** : होना–रोज जाणाऱ्यांना त्याचं कांहीं सुद्धां वाटत नाहीं–

**शिदबा** : रोज बघणाऱ्याला कशाचंच कांहीं वाटत नाहीं–मढेघाटावर गवऱ्या विकणाऱ्याला माणूस मेल्याची देखील हळहळ वाटेनाशी होते रोज मढीं बघून–पण माणसाला कशाचंच कांहीं वाटेनासं होणं हें चांगलं आहे का आका !

**श्रीपत** : तुम्हांला तरी कुठें काय वाटत होतं !

**शिदबा** : खरंच ! मला तरी कुठें काय वाटत होतं !–पांडुरंगानं मुद्दाम हा खेळ दाखवला मला–

**श्रीपत** : पांडुरंग ! ज्या पांडुरंगानं खेळ दाखवला त्या पांडुरंगाला हा खेळ बंद करतां नसता का आला !

(या प्रश्नाला उत्तर न सुचल्यामुळें संतापून, मोठ्यानें ओरडून)

**शिदबा** : अरे मग तुम्हांआम्हांला माणसाच्या जल्माला कां घातलंय त्यानं ?

**श्रीपत** : जीवनाचीं हीं नवीं मूल्यं कळणार नाहींत तुम्हांला–

**शिदबा** : तें काय तें तुम्हाला कळलं आहे ना–मग तुम्ही तरी भुकेल्याच्या पोटांत चार घास घालायची कांहीं तोड काढा.

**श्रीपत** : तेंच करणार आहें मी–आमच्या संघटनेतर्फें आणि आमच्या पेठेतर्फें निवडणुकींत उभा रहाणार आहें मी–

**शिदबा** : आणि–

**श्रीपत :** निवडून आलों तर खूप कार्य करतां येईल मला–

**शिदबा :** मग अवश्य रहा–

**श्रीपत :** पण त्यासाठी आधीं मलाच तीन चार हजार रुपये गोळा करायला हवेत–

**शिदबा :** ते कशाला ?

**श्रीपत :** निवडणुकीचा खर्च कुठून करायचा ?

**शिदबा :** अहो–मग त्या तीनचार हजार रुपयांत दहा कुटुंबं वर्षभर तरी जगतील कीं–

**श्रीपत :** असलीं ठिगळं किती मारीत बसणार तुम्ही ?

**शिदबा :** हें बघा–चार जगांच्या ठिगळांतून एकाची तरी गोधडी होईल असं वाटतं मला–आमचा आपला भाबडा वेदान्त आहे–तुम्ही उभे रहा निवडणुकीला, काय वाटेल तें करा पण उपाशी पोटांत चार घास जायची तजवीज करा–

**श्रीपत :** तुम्ही काय मदत करूं शकतां मला ?

**शिदबा :** मी काय मदत करणार ! ! रद्दी विकायची का ? म्हणून ओरडतो –त्याच्या जोडीला श्रीपतरावांना मतं द्या असं ओरडीन–

**श्रीपत :** एवढ्यानं काय होणार ? पैशाशिवाय काय होणार ?

**शिदबा :** मग पैशाशिवाय होणारीं कांहीं तरी अंगमेहनतीचीं अक्कलहुशारीचीं कामं काढा–इतके शिकलेसंवरलेले तुम्ही, माझ्यापेक्षां तुमचंच डोकं चांगलं चालायचं–

**सरस्वती :** बाबा–जेवून घ्या ना थोडं–

**शिदबा :** खरंच नको पोरी–तुझं झालं कीं नाहीं जेवण ?

**सरस्वती :** तुम्हीं उपाशी असतांना मी जेवूं होय ?

**शिदबा :** हें बघा श्रीपतराव–हीच माया आणखी चार लोकांत वाटूं या म्हणतों मी–

**श्रीपत** : हो–आणि आळसाला उत्तेजन देऊं या–

( बाहेरून अभंग ऐकूं येतो.–जे का रंजले गांजले–)

**श्रीपत** : घ्या ! पांडुरंगानं पाठवला तुमच्या दारांत भिकारी–

**शिद्बा** : खरंच पाठवला–आक्का, हाक मार त्या पोरीला–माझं ताट वाढलं असलंस तर दे तिला– ( सरस्वती जाऊं लागते. )

**श्रीपत** : कुठं चाललीस ?

**शिद्बा** : कां ?

**श्रीपत** : एक भिकारीण उपाशी मेली म्हणून देश ओस पडत नाहीं–चाळीस कोट प्रजा झाली आहे.

**शिद्बा** : ( उठतो–रागाने श्रीपतकडे पहातो व बाहेर निघतो. ) ये–ये ( शिद्बा आंत येतो. )–आक्का–ताट वाढून ठेव–जिवंत माणसांना रद्दीचा भाव आला नाहीं अजून–ये–ये पोरी–( लता दारांत उभी आहे–सहा सात वर्षांची मुलगी )–ये–आंत ये–

**श्रीपत** : बराय् मी जातों–

**शिद्बा** : बसा–रागावूं नका श्रीपतराव–उद्यां जावई होणार तुम्ही आमचे. आक्का, रुसला ग आमचा जांवई–चहा ठेव–

**श्रीपत** : कुठल्या तरी भिकाऱ्याच्या घशांत ओता. ( वाटेवरल्या लतेला रागानें बाजूला करून जातो.–शिद्बा त्या पोरीला उचलून घेतो. सरस्वती आंतून येते. )

**सरस्वती** : आं ! हे गेले–

**शिद्बा** : रागावला तो माझ्यावर–येईल उद्यां–तरुण आहे–रक्त उसळतं आहे–हिचं ताट वाढ लवकर. नांव काय ग तुझं ?

**लता** : लता !

**सरस्वती** : ( स्वयंपाकघराकडे वळतां वळतां )–लता ! भिकाऱ्यांनीं नांवं विवं छान ठेवलीं आहेत–

**शिद्‌बा** : का ग आका ? भिकाऱ्यांना नांवहि चांगलं असूं नये–लता म्हणजे काय ग आका ?

**सरस्वती** : वेल ! ( स्वयंपाकघरांत जाते. )

**शिद्‌बा** : वेल ? साजरं आहे नांव ! गाणं कसलं ग म्हणत होतीस पोरी ?

**लता** : जे का रंजले गांजले !

**शिद्‌बा** : तुकोबारायाचं–म्हणतेस का ? तोंवर आका ताट वाढतेय तुझं–

**लता** : जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ।
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा–
ज्यासि अपंगिता नाहीं–त्यासी धरी जो हृदयीं
दया करणे जे पुत्रासी तेचि दासा आणिक दासी
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनांचें चित्त
तुका म्हणे सांगूं किती–तेचि भगवंताची मूर्ति !

**शिद्‌बा** : चांगलं म्हटलंस पोरी–कुणीं शिकवलं ग तुला ?

**लता** : बाबांनीं–

**शिद्‌बा** : काय करतात तुझे बाबा ?

**लता** : ठाऊक नाहीं मला–

**शिद्‌बा** : ठाऊक नाहीं ?

**लता** : नाहीं–त्यांना पकडलं पोलिसांनीं–

**शिद्‌बा** : कां ?

**लता** : सायकल चोरली त्यांनीं–आमच्या चाळींतली चंद्री आहे ना ती म्हणते–पण खोटं आहे–बाबा कांहीं चोर नाहींत माझे !

**शिद्‌बा** : ऑं–असं होय ? मग घरीं कोण आहे आतां ?

लता : फोण नाहीं–

शिद्‌बा : आका–

सरस्वती :– ( आंतून ) हो वाढतें–

शिद्‌बा : तसं नाहीं, जरा बाहेर ये–

सरस्वती : हो– ( बाहेर येते. )

शिद्‌बा : ही पोरगी राहूं दे आपल्या घरीं–

सरस्वती : वेड लागलं नाहीं ना बाबा तुम्हांला–

शिद्‌बा : लागलंय असं समज ! ( तिच्या गळ्यांतली झोळी काढतो– त्यांत एक बाहुली असते. ) हें काय ग !

लता : माझी आई कीं नाहीं–दवाखान्यांतून एक बाळ आणायला गेली होती– त्याला द्यायची होती ही बाहुली–

शिद्‌बा : मग–

लता : पण ती तिकडूनच देवाकडे गेली–

शिद्‌बा : असं होय– आका, ही पोर राहिली आजपासून आपल्या घरीं–

लता : ही कोण ?

शिद्‌बा : ही तुझी आक्का–

लता : आणि तुम्ही–

शिद्‌बा : मी– मी तुझा आजोबा–

( तिला जवळ घेतो– आपल्या गालाला तिचा गाल लावून पांडुरंगाच्या तसाबिरीपुढें उभा रहातो. )

• • •

# अंक दुसरा

[ स्थळ– पहिल्याच अंकांतलें. काळ :– पाहिला आणि दुसरा अंक ह्यांच्यामध्यें सुमारें एक पंधरवडा. ]

शिदबा बाहेरून हाका मारतो,– आक्का आक्का–

लताच्या हाका– आक्का– आक्का–

आक्का शांतपणानें आंतून येते आणि दाराची कडी काढते.

**शिदबा** : हें रासन ! हं लताबाई चला, आक्काला मदत करूं लागा–

**सरस्वती** : नको !

**शिदबा** : लता– एक माणूस कां रागावलंय ग आज ?

( खुणेनें आक्काकडे बोट दाखवितो– )

**लता** : विचारूं ?

**शिदबा** : विचार ( खुणेनें सांगतो. )

**लता** : आक्का– रागावली आहेस ?

**सरस्वती** : नाहीं ग बाई– कुणावर रागवायचं !

## अंक दुसरा

**शिदबा :** हें बघ आक्का–ज्याच्यावर रागवायचं तो येणार आहे आज ! आम्हीं जाऊन आलों त्यांच्या घरीं–लताबाई कुठें गेलों होतों आपण ?

**लता :** श्रीपतरावांच्या घरीं–

**सरस्वती :** त्यांच्या घरीं गेलां होतां तुम्ही ?

**शिदबा :** हो– चहा दिला त्यांनीं आम्हांला– लताबाईला चॉकलेट दिलं–

**लता :** हें बघ एक तुला आणलंय कीं मीं आक्का– घे–

**सरस्वती :** ( स्वस्थ उभी रहाते. )

**शिदबा :** घे कीं आक्का– ती देतेय तर– दे बेटा–

**सरस्वती :** खा तूं–

**लता :** मी खाऊं– तूं खा कीं ग–

**सरस्वती :** ( चॉकलेट हातांत घेते )– बाबा– कशाला गेलां तुम्ही त्यांच्या घरीं ?

**शिदबा :** वा ग वा– काय झालं गेलों म्हणून ?

**सरस्वती :** ते नाहीं नाहीं तें बोलले असतील तुम्हांला–

**शिदबा :** नाहीं नाहीं तें बोलायला काय खूळ लागलंय त्याला ? अग माणूस रागाच्या भरांत काय वाटेल तें करतो– म्हणून जल्मभर तेंच उगाळीत बसायचं काय ? मीं त्याची माफी मागितली– उतरला रागाचा पारा– जेवायला येणार आहे आतां.

**सरस्वती :** तुम्ही कशाला क्षमा मागितलीत ?

**शिदबा :** आतां त्याला निवडणुकीला पैसे देतां आले नाहींत मला– त्याला वाटलं पैसे असून मी देत नाहीं. सांगून पटलं नाहीं त्याला– माफी मागितल्यावर पटलं– खुळीं पोरं तुम्ही– तुमचे मान अपमान कुठें ध्यानांत ठेवत बसूं मी–

**सरस्वती :** पण मला नाहीं खपायचं त्यांनीं तुमचा असा अपमान केलेला–

**शिद्बा** : पण असा अपमान करून घ्यायला व्हायले आहेत किती दिवस माझे ?

**सरस्वती** : असं कां बोलतां बाबा ?

**शिद्बा** : कशाला भुईला भार होऊन व्हायचं उगीच ! म्हातारपणांत नातू बघायची मोठी हौस असते– पांडुरंगानं ह्या पोरीला दिली पाठवून दारांत आणि आजोबा केलं ! नातू नाहीं तर नात दाखविली– बस झालं ! हिचा बा सुट्न येईपर्यंत राहील ! एकदा बाबा आले कीं लताबाई चालल्या आपल्या घरीं–

**लता** : केव्हां येणार बाबा ?

**शिद्बा** : येतील आतां लवकर– बरं जातों मी–

**सरस्वती** : कशाला जातां आतां उन्हाचं ?

**शिद्बा** : अग धंदा सोडून चालतं कुठे ? नोकरी बरी– हक्काची सुट्टी असते– जातों–

**सरस्वती** : लवकर तरी या–

**शिद्बा** : फार नाहीं जात कुठें– काल एका साह्यबानं टाइम्सची रद्दी काढून ठेवतों म्हणून सांगितलंय– घेऊन येतों– आणि हें बघ श्रीपतराव येतील, उगाच भांडू नका– जातों मी–

**लता** : आजोबा, मी येऊं ?

**शिद्बा** : चल ! गठ्ठा घेशील काय डोक्यावर ?

**लता** : हो घेईन कीं–

**शिद्बा** : तर ?– हिलाच कडेवर घेऊन यावं लागतं कीं ग आक्का– चालवत नाहीं तिला फार–

**सरस्वती** : मग कशाला जातेस ? रहा लते तूं–

**शिद्बा** : येऊं दे–कसं ओरडायचं करून दाखव आक्काला–

## अंक दुसरा

**लता :** काय रद्दी विकायची आहे का बाई ऽ ऽ अहो माडीवरले बाई ऽ ऽ काय रद्दी आहे का ऽ ऽ

[ शिदबा हसतो व तिच्या पाठींत चापट मारून तिला पाठुंगळीला घेऊन बाहेर जायला निघतो व पुन्हां वळून– ]

**शिदबा :** आक्का, रुसलेल्या जांवयाची बाबापुता म्हणून समजूत काढली आहे, भांडूं बिंडूं नका–आतां त्याच्याच बरोबर नांदायचं आहे तुला जलमभर ! ( लताला ) चला रद्दीवाले–

( जातात )

**सरस्वती :** लवकर या–

( सरस्वती गाणें गुणगुणत खोली ठीकठाक करते. मग स्वैंपाकघरांत जाते. जातांना बाहेरच्या दाराला कडी लावते. सरस्वती आंत जाईपर्यंत दारावर जोराजोरांत थापा " सरोज, सरोज,–दार उघड लवकर, कॉंग्रॅच्युलेशन्स, कॉंग्रॅच्युलेशन्स, " असें अत्यानंदानें श्रीपत ओरडतो आहे :

सरस्वती लगबगीनें येऊन दाराची कडी काढते. श्रीपत धांवत आलेला आहे, अजून धापा टाकतो आहे. तो सरोजचे दोन्ही हात हातांत घेऊन कॉंग्रॅच्युलेशन्स कॉंग्रॅच्युलेशन्स म्हणतो. )

**सरस्वती :** इश्श, असं वेड लागल्यासारखं काय करतां !

**श्रीपत :** अग अजून मला वेड कसं लागलं नाहीं याचंच आश्चर्य वाटतंय्–सरोज, मला हर्षवायु झाल्यासारखं नाहीं ना वाटत ?

**सरस्वती :** सांगा तरी काय झालं ?

**श्रीपत :** काय देशील ?

**सरस्वती :** अहो, पण असं काय झालं काय ?

**श्रीपत :** हें वाच ( तार दाखवतो. ) ही बघ आत्तां खालीं तार आली–

**सरस्वती** : आतां मात्र काय तें लवकर सांगा—माझा जीव गुदमरायला लागलाय इथं—कसली तार !

**श्रीपत** : हें वाच ! "भवसागर"च्या कोड्यांत बाबासाहेबांना तीस हजारांचें पहिलं बक्षीस मिळालं ! अग—बाबांना तीस हजारांचें पहिलं बक्षिस मिळालं—

**सरस्वती** : बाबांना तीस हजार रुपये—बाबा ! लता कुठें आहे—बाबा कुठें आहेत—तीस हजार ?

**श्रीपत** : तीस हजार ! ! सरोज !— जगांत परमेश्वर आहे ह्या गोष्टीवर माझा एकदम विश्वास बसला ! बाबासाहेबांची श्रद्धा सफल झाली—त्यांच्या तपश्चर्येला परमेश्वर प्रसन्न झाला ! हे खरे भाग्यवान् !

**सरस्वती** : बाबा कुठें आहेत पण ! !

**श्रीपत** : खालीं आहेत—त्यांना तार वाचून दाखवली—ते एकदम गप्पच झाले. त्यांचा विश्वासच बसेना—चाळींतल्या मंडळींचा गराडा पडलाय त्यांच्या भोंवतीं—तुझे चिक्कीवाले काका तर येणाजाणाऱ्याला चिकी फुकट वाटायला लागले आहेत ! तीस हजार !—वा ! !

**सरस्वती** : आतां तुम्हांला निवडणुकीला उभं रहातां येईल !

**श्रीपत** : अर्जाची तारीख निघून गेली, सरोज !

**सरस्वती** : अरे देवा ! !

**श्रीपत** : कांहीं हरकत नाहीं ! ! निवडणुकींतच काय एवढं मोठं ? उगाच आपलं वाटत होतं—त्या रागाच्या भरांत मी बाबासाहेबांना काय वाटेल तें बोललों—पण त्या देवमाणसानं एका अक्षरानं मला उलट उत्तर दिलं नाहीं. उलट माझीच क्षमा मागितली—खरंच असल्या संतांच्या पायाचं रोज तीर्थ घ्यावं—सरोज, बोल ना—

**सरस्वती** : काय बोलूं—मला तर बाई कांहीं सुचेनासच झालंय—

**श्रीपत** : साहाजिक आहे !—सरोज, तीस हजारांत आपण काय वाटेल तें करूं शकतों—

## अंक दुसरा

**सरस्वती** : आज आधीं शाळेला रजेची चिठ्ठी पाठवूं या !

**श्रीपत** : आज ?–मी तर कायमची पाठवायच्या विचारांत आहे ! तीस हजार रुपये आपल्या हातांत आहेत. हेडमास्तरसकट शाळा विकत घेऊं शकतों आपण ! !

**सरस्वती** : खरंच ! मलाहि नोकरीचा कंटाळा आला आहे !

**श्रीपत** : आतां यापुढें नोकरी नाहीं ! आणि कुठला स्वाभिमानी माणूस नोकरी करेल ? नोकरी म्हणजे गुलामगिरी ! ! सरोज !–लग्न झाल्यावर महिनाभर काश्मीरला जाऊन येऊं या आपण !–ह्या शिक्षकांच्या संपाविपाच्या प्रकरणांत डोकं कसं तापलंय–हिमालयाच्या सान्निध्यांत मनाला शांतता वाटेल !–शेवटीं माणसाला आध्यात्मिक समाधान मिळवायचंच महत्त्व पटायला लागतं–आपण जाऊं या काश्मीरला–

**सरस्वती** : काश्मीर–भूगोलाच्या पुस्तकांत आजवर नुसतीं वर्णनं वाचलीं होतीं आपण–आतां प्रत्यक्ष बघायला मिळणार आपल्याला–

**श्रीपत** : सुंदर वनश्री आणि त्याहूनहि सुंदर अशा तुझ्यासारख्या वनदेवतेच्या सहवासांत परमेश्वराच्या त्या विशाल स्वरूपाच दर्शन–छे मला आतांच कसं दिव्य पवित्र वाटायला लागलं आहे–आपण काश्मीरला जाऊं–परत आल्यावर माझ्या मनांत एक छोटा छापखाना काढायचा बेत आहे–

**सरस्वती** : त्यापेक्षां छोटासा बंगला बांधूं आपण. छोटीशी बाग–एक छोटीशी मोटार–

**श्रीपत** : आणि एक छोटीशी बाबागाडी–

**सरस्वती** : इश्श !–बाबा कसे नाहीं आले अजून–

( शिदबा आणि संभा चिकीवाला येतो. शिदबा शांतपणें येतो. संभाचा आवाज : चला हटारे पोरांनो, अरे बाबाला कधीं बघितला नाहीं का कधीं तुम्ही ? )

**संभा** : काय शिर्पतराव–कोडीं सोडवूं नका म्हनत व्हतां न्हाई का !–उभ्या गांवाची रद्दी विकून तीस हजार कधीं गावले असते का !

( शिदबा शांतपणें खाटेवर बसतो. )

**सरस्वती** : बाबा ! ! तीस हजार ! ! बाबा, मला काय द्यायचं ठरवलंय तुम्ही–?

**शिदबा** : काय पाहिजे बाळ तुला ! !

**सरस्वती** : तसं नाहीं. तुम्हीं होऊन दिलं पाहिजे ! !

**शिदबा** : ( खिशांत हात घालतो–दोन रुपये काढून– ) घे हे–

**सरस्वती** : हे काय दोनच रुपये–

**शिदबा** : अग एका दिवसाची सगळी कमाई तुला दिली ! आणखी काय पाहिजे पोरी ?

**सरस्वती** : बाबा आजच्या दिवसाची तुमची कमाई दोन रुपये नाहीं–तीस हजार रुपये आहे–

**शिदबा** : तीस हजार रुपये कमाई नाहीं आका माझी–

**श्रीपत** : वा कमाई नाहीं कशी ? तुम्ही विचार करून–बुद्धि पणाला लावून कोडं सोडवलंत–तुम्हांला बक्षीस मिळालं–

**शिदबा** : खरं सांगायचं म्हणजे ह्या संभाच्या नादानं मीं कोडं सोडवलं–एक ह्यानं सोडवलं–एक मीं सोडवलं–खरं तर ह्या तीस हजारांतले पंधरा हजार त्यालाच द्यायला पाहिजेत–

**संभा** : तूं मस्त देशील–मी घ्याला पाहिजेत ना–बस्स तुझ्या किस्मतचं चक्कर आज फिरलंय–माजंबी फिरून जाईल यकाद दिवशीं–पर तुझं नशीब मी नाहीं घेणार–

**श्रीपत** : वा–बरोबर आहे–ही निष्ठा–ही माणुसकी–बस्स ही जतन करून ठेवणं म्हणजेच संस्कृति जतन करून ठेवणं–नाहीं तर कोणालाहि सहज मोह झाला असता ते पंधरा हजार रुपये घेण्याचा–

# अंक दुसरा

**संभा** : तुम्ही मात्तर आमचं एक बक्षीस घालिवलंत शिर्पतराव—तरुनीचं चित्त म्हनालात तें वित्तंच बरोबर होतं. आमच्या सा चुक्या निघाल्या—

**सरस्वती** : बाबा, तुम्ही बोलत कां नाहीं ? तुम्हांला आनंद झाला नाहीं ? तीस हजार रुपये मिळाले आपल्याला—

**श्रीपत** : हो ना—आपण काय वाटेल तें करूं शकतों त्याचं—

**शिदबा** : ( संथपणें ) होय ! वाटेल तें करूं शकतों—अगदीं वाटेल तें करूं शकतों—

**संभा** : शिदबा—मी सांगतों तुला ! गांवाकडे मळा घे एक झकास—ऊस लाव. आपल्या रामकू भोंसल्यानं मोटारगाडी घेतली उसावर—

**श्रीपत** : छे छे—मळ्याबिळ्याची दगदग सोसायची नाहीं बाबासाहेबांना—उन्हातान्हांत राबायला होणार नाहीं त्यांना—

**संभा** : मग आतां काय घरांत सांवलींत बसून पैशे येतात काय शिर्पतराव ?

**श्रीपत** : अहो, भलतंच कांहीं तरी काय बोलतां ? मळा घ्यायचा म्हणे ! मोटार काय आपण आज सुद्धां घेऊं शकतों—सातआठ हजारांत सुंदर छोटी गाडी येईल !—आपणां तिघांना काय करायची आहे मोठी गाडी—

**सरस्वती** : खरंच—आपल्या चेअरमनसाहेबांची मोटार आहे बघा—छान आहे—

**श्रीपत** : तेवढी बस !

**सरस्वती** : मोटार घ्यायची ना बाबा—

**शिदबा** : ( एकदम दचकल्यासारखा ) आं !—हो—हो—

**श्रीपत** : मग आपण मोटारींतूनच जाऊं या की काश्मीरला—

**सरस्वती** : हो म्हणजे बाबांनाहि नेतां येईल बरोबर—

**श्रीपत** : बाबासाहेबांना काश्मीरपेक्षां पंढरपूरला गेल्यावर अधिक बरं वाटेल—नाहीं बाबासाहेब ?

( शिदबा अगदीं स्वस्थ बसला आहे. )

**संभा** : शिदबा–गप का ? ( त्याच्या शेजारीं खाटेवर बसतो. )

**शिदबा** : संभा–( त्याच्या पाठीवर हात ठेवतो. )

**श्रीपत** : माणसाला एकदम दुःखाचा किंवा आनंदाचा फार मोठा धक्का बसला कीं असंच होतं–मी डॉक्टरना बोलवूं का–

**सरस्वती** : बाबा–काय होतंय तुम्हांला–डॉक्टरना आणूं या का ?

**शिदबा** : छे ग–कांहीं नाहीं–जरा उगीच छातींतून कळ गेल्यासारखं झालं–पांडुरंगा–आका–एक नीरांजन लाव–

**सरस्वती** : नीरांजन ! पण सकाळीं पूजा केली होती ना तुम्हीं !

**शिदबा** : हं–पुन्हां करणार आहे–

( सरस्वती व श्रीपत एकमेकाकडे पहातात. श्रीपत तिला खुणेनें नीरांजन आण म्हणून सांगतो. )

**संभा** : शिदबा–सत्यनारायनाची पूजा करूं या मोठी–

**शिदबा** : हो करूं या–

**संभा** : अगदीं जंगी पूजा झाली पाहिजे–भजनी मेळे–ब्यांड वाजंत्री लावून. परवा नाना पेठेंतल्या शिवरामदादांनीं पूजा केली सत्यनारायनाची–धा हजार मानूस पर्साद खाऊन ग्येलं असल !

**श्रीपत** : छे !–निष्कारण पैशांचा अपव्यय आहे !

( सरस्वती नीरांजन पेटवून आणते व विठ्ठल–रखुमाईच्या तसबिरी समोर ठेवते. )

**शिदबा** : ( बसल्या जागेवरून नमस्कार करतो. ) विठ्ठला–पांडुरंगा–

**श्रीपत** : हें बघा–खरा श्रद्धेनें केलेला नमस्कार कुठूनहि देवाला पोहोंचतो–काय बाबासाहेब–

**शिदबा** : आं–होय–आका–देवाचं कांहीं तरी गाणं म्हण–मन घाबरं झालंय–

**श्रीपत** : म्हण कीं सरोज–बाबासाहेबांना तितकंच बरं वाटेल–

( रद्दींतलें एक मासिक उचलून त्यांना वारा घालायला लागतो. )

**शिदबा** : नको–नको–संभा–धंद्याला जायचं नाहीं आज–

**संभा** : धंदा ? आज कुठला धंदा ! समदी चिकी वाटून न्हाइ का टाकली–तुला तीस हजाराचं इनाम मिळाल्याचं कळल्यावर–

**शिदबा** : तीस हजार–आक्का म्हण–

**सरस्वती** : अभंग म्हणते–

संसारीं मी केला तुळशीचा मळा
करदा सांवळा पांडुरंग
कृपेची विहीर चालतसे मोट
खळाळती पाट वैराग्याचे
बैल होऊनीया वेद राबताती
निंदणी करती श्रुतिस्मृति
डोलांत डोलती सांवळ्या मंजिरी
फळाची अंतरीं आस नाहीं.

(अभंग ऐकतां ऐकतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागतात. लता बाहेरून गाणं ऐकून आंत येते आणि शिदबाच्या मांडीवर बसते–शिदबा हळू हळू तिच्या केसावरून हात फिरवतो. अभंग संपतो–दारावर टक टक ऐकूं येते. )

**संभा** : कोण आहे ? ( दार उघडतो ) या–

( भवसागर पत्राचा बातमीदार काणे प्रवेश करतो. )

**काणे** : नमस्कार– ( दाराबाहेर वळून–बाहेरच्या कुठल्या तरी इसमाला ) थँक्स हं–

**संभा** : कोण आहे–

**काणे** : नाहीं–त्यांनीं पत्ता दाखवला मला बरोबर–

**श्रीपत** : कोणाला भेटायचंय आपल्याला ?

**काणे** : तुम्हांलाच–शिदबा कोंडिबा पवार आपणच !

**श्रीपत** : नाहीं हे–

**काणे** : कॉंग्रॅच्युलेशन्स ! वा वा–भाग्यवान् आहांत ! ( शिदबाचे दोन्ही हात धरून हलवतो. ) मी भवसागर पत्राचा कूट विभागाचा प्रतिनिधि सदुभाऊ काणे–

**श्रीपत** : असं होय ! बसा ना– ( इकडे तिकडे पहातो– )

**संभा** : ( रद्दीचा एक गठ्ठा उचलतो व पुढें टाकतो. ) बसा–

**काणे** : वा–आमच्याच पेपरचे वाचक दिसताहेत–अरेच्या–व्यासंग दांडगा दिसतोय आपला–

**संभा** : आं–

**काणे** : नाहीं म्हणजे–वृत्तपत्रीय व्यवसाय आहे कीं काय आपला ?

**संभा** : न्हाइ–रद्दीचा धंदा आहे ह्यांचा–

**काणे** : म्हणजे एकच कीं ! ( हंसतो ) आपण ह्यांचे बंधु काय ?

**संभा** : तसं म्हना पायजे तर–मी संभा–संभा नामा कोतमिरे. चिकीचा धंदा आहे माझा–

**काणे** : अस्सं–

**संभा** : ही सरस्वती–बाबाची लेक–ह्ये शिरपतराव ह्यांचे जावाई होनार आतां–

**काणे** : वा वा–म्हणजे तुमच्या लग्नासाठीं अगदीं स्वर्गांतून पडल्यासारखं वाटलं असेल हें पहिलं बक्षीस ! आपण काय करतां–

**श्रीपत** : मी शिक्षक आहें–ह्याहि शिक्षिका आहेत–

**काणे** : असं का ? अरे वा छान ! ! ( कातड्याची बॅग उघडतो. ) बाबा-

साहेब तुमचा तीस हजारांचा चेक पंधरा एक दिवसांनीं मिळेल. ( शिदबा त्याला नमस्कार करतो.) अहो आम्हांला कशाला नमस्कार करतां–बाबासाहेब मला आपल्याबद्दल थोडी माहिती पाहिजे होती–

**शिदबा** : माहिती–

**काणे** : हो, म्हणजे असं कीं लक्षावधि कुटुंबांमध्यें आमच्या भवसागर पत्रांतल्या ह्या कोड्यांच्या रूपानें आम्हीं जें आनंदाचं बी पेरतों त्याची फुलबाग आज आपल्या घरांत फुलली आहे– आलं लक्षांत !– मानवी जीवन हें कोणत्या ना कोणत्या तरी आशातंतूचा आधार घेऊन वर जाण्याचा प्रयत्न करीत असतं– आलं लक्षांत ! एका थोर इंग्रज लेखकानं म्हटलं आहे कीं धिस लाइफ इज ए लीप इन द डार्क– आलं लक्षांत– तेव्हां अशा या भविष्यत्कालाच्या अंधारांत चांचपडत असतांना पहिल्या बक्षिसाच्या रूपानें तेजोमय प्रकाशगर्भच तुमच्या दारांत आला असं तुम्हांला वाटल्यानंतर तुमच्या आशातंतूंचा बळकट रज्जू झालेला आहे असं तुम्हांला वाटलं असणारच. आलं लक्षांत–

**संभाजी** : काऽऽही कळना– आलं लक्षांत ? शिरीतराव काय म्हन्तात हें–

**श्रीपत** : जरा तुम्ही गप बसा– हं काणेसाहेब, आपण काय म्हणत होता–

**काणे** : नाहीं म्हणजे मला मुलाखत घ्यायची होती ह्यांची–

**श्रीपत** : घ्याना– बाबासाहेब यांना आपली मुलाखत घ्यायची आहे–

**शिदबा** : काय !–

**काणे** : नाहीं म्हणजे आमचीं कोडीं सोडवणारे– जे लक्षावधि लोक आहेत, त्यांना मार्गदर्शन म्हणून आपण कांहीं संदेशवजा मत किंवा मतवजा संदेश द्यावात अशी इच्छा आहे माझी– माझी म्हणजे भवसागर पत्राची–

**शिदबा** : संदेश– छे– मला काय कळतं त्यांतलं– श्रीपतराव काय म्हणतात हे–

**काणे** : ( श्रीपतरावांना ) आपण मुलाखत दिलीत तरी चालेल–

**श्रीपत** : देऊं या कीं– सरोज, – काणेसाहेब चहा घेतां ना–

**काणे** : हो घेतों कीं ( सरस्वती आंत जाते. )– हं– ( कागद पेन्सिल काढतो. ) तर मला आपल्याला असं विचारायचं आहे कीं– आपण कोडीं केव्हांपासून सोडवतां–

**श्रीपत** : बाबासाहेब– आपण केव्हांपासून कोडीं सोडवतां ?

**संभा** : अहो कुठलं काय !– मी त्या दिवशीं ह्याच्या मागं लागलों म्हनूनश्यान पाठवलं त्येनं एक सोडवून–

**काणे** : नाहीं पण हें असं लिहून बरं दिसणार नाहीं– आपल्या शब्द-कोड्यांचा मी एक जुना चहाता आहे– गेलीं दहा वर्षें– नाहीं पण हें चालायचं नाहीं– भवसागराला चारच वर्षं झालीं– गेलीं चार वर्षं मी भवसागर नियमितपणानें विकत घेतों–

**संभा** : वजनावर इकत घेतों असं लिवा–

**काणे** : वजनावर ?

**संभा** : तुम्हीं बसलायसा ती रद्दी– तुमच्याच फेप्राची हाय की–

**काणे** : रद्दी ?

**संभा** : व्हय–रद्दी इकत घ्यायचा न् इकायचा धंदा आहे त्यांचा. सांगितलं नाहीं का म्यां–

**काणे** : अरे हो विसरलोंच ! थांबा– मग असं लिहूं या– श्रमजीवी रद्दीवाल्याच्या घरांत सोन्याच्या पावलांनीं लक्ष्मी आली– ( भरभर लिहूं लागतो– ) आपलं नांव काय म्हणालां–

**श्रीपत** : श्रीपतराव सासवडकर–

**काणे** : ( लिहूं लागतो– )

**श्रीपत** : प्राथमिक शाळेंतल्या शिक्षकसंघाचा चिटणीस आहें मी–

**काणे** : अस्सं– ( लिहूं लागतो )– शिवाय यांचे भावी जांवई. बरं ही छोकरी ह्यांचीच ना ?

**श्रीपत** : नाहीं—

**शिद्बा** : काय नाहीं ! नात आहे माझी—

**काणे** : नात !

**शिद्बा** : होय—

**काणे** : अस्सं. वा गोड आहे— ( लिहितो ) म्हणजे मुलाची मुलगी कीं मुलीची !

**शिद्बा** : मुलाची.

**श्रीपत** : बाबासाहेब— अहो तसं नाहीं काणेसाहेब—

**शिद्बा** : काय नाहीं !

**काणे** : मुलगा काय करतो आपला ?

**शिद्बा** : मुलगा— तुरुंगांत आहे—

**श्रीपत** : बाबा—

**शिद्बा** : लिहा मी सांगतों तें—

**संभा** : अरे शिद्बा, का उगाच थट्टा चालिवली आहे त्या पेपरवाल्यांची— पेपरवाले, ह्यो म्हातारा लय खश्याळ हाय बरं काय— काय काय तुमच्या मनाला येईल तें लिवा—

**काणे** : वा असं करूं— मुलगा तुरुंगांत— एकुलती एक मुलगी, छोटीशी गोड नात घरांत— मुलीच्या लग्नाची काळजी— आणि स्वर्गातून तीस हजाराची बरसात— इतके झकास मुद्दे सोडूं कीं काय !

**श्रीपत** : तसं नाहीं काणेसाहेब— कुठली तरी बेवारशी मुलगी—

**शिद्बा** : खबरदार— बेवारशी— माझी नात बेवारशी— ( लताला जवळ घेतो. )

**काणे** : ( पटकन फोटो घेतो. ) थँक्यू— आपल्या दुर्दैवी नातीच्या प्रेमानं

त्यांचें अंतःकरण दाटून आलें- बरं बाबासाहेब-कसल्या गुन्ह्याबद्दल शिक्षा झाली आपल्या चिरंजिवांना-

**श्रीपत** : काणेसाहेब, तुमचा गैरसमज होतोय-

**काणे** : नाहीं- म्हणजे हा विषय आपल्याला अप्रिय असेल तर सोडून देऊं म्हणजे माझा कांहीं आग्रह नाहीं- हें- बरं मग आपल्याला हें बक्षीस मिळालं तीस हजारांचं असं कळल्यावर काय वाटलं आपल्याला ?

**शिदबा** : भीति वाटली-

**काणे** : भीति ! !

**शिदबा** : कां ?

**काणे** : नाहीं-म्हणजे हा अनुभव नवा आहे ! ( लिहितो ) भीति वाटली-

**शिदबा** : होय भीति वाटली-वाटलं देवाच्या मनांत माझी परीक्षा बघायचं आलंय-

**काणे** : परीक्षा ? कसली परीक्षा ?

**शिदबा** : काय सांगूं साहेब-मला कांहीं विचारूं नका-

**काणे** : नाहीं आतां फार नाहीं विचारत-तीस हजार रुपये मिळाले आहेत आपल्याला-आपण कांहीं बेत केले असतील-

**संभा** : मी सांगितलंय त्येला उसाचा मळा कर म्हणून-

**काणे** : छान आहे-उसाच्या मळ्याचें उराशीं बाळगलेलें गोड स्वप्न साकार झालें-

**श्रीपत** : छे छे, मळाबिळा कांहीं करणार नाहीं आम्हीं.तूर्त आमचा काश्मीरला जायचा बेत आहे-

**काणे** : तेंहि कांहीं वाईट नाहीं-काश्मीरची सफर-

**शिदबा** : कशाला लिहितां आहां हें सगळं-

**काणे** : वा आपली मुलाखत-फोटो देऊन छापून येईल ना येत्या रविवारच्या भवसागरांत-

**शिद्‌बा** : हे बघा भवसागरसाहेब–हें कांहीं छापूं नका–

**काणे** : म्हणजे–वा ! अहो निम्मा लेख तयार झालाय माझा इथें ! ! रद्दी-वाल्याच्या घरांत सोन्याच्या पावलांनीं लक्ष्मी प्रकटली ! !–खालीं तुमचा फोटो–नातीला जवळ घेतलेला–एकशेंविसाव्या कोड्याचे भाग्यवंत मानकरी शिद्‌बा ऊर्फ बाबासाहेब पवार–पुरुषस्य भाग्यम्–भवानी पेठेंतल्या लक्ष्मीनें पाठ फिरवलेल्या विभागांतील एका चाळींतल्या एका खिन्दाडांत आज दिवा-ळीचा आनंद होता ! !– ‘ भवसागर ’ पत्राचा मी प्रतिनिधी आहें असं कळल्यावर–बाबासाहेबांनीं हंसतमुखानें माझें स्वागत केलें. चालेल ना ? खोलींत शिरतांक्षणींच ठिकठिकाणीं रचलेले वर्तमानपत्रें आणि मासिकें ह्यांचे गठ्ठे पाहून बाबासाहेबांच्या व्यासंगाची मला कल्पना आली. ( सगळे जण त्याच्याकडे आश्चर्यानें पाहतात. ) असूं दे–कांहीं होत नाहीं–हं– ( वाचूं लागतो. ) पण त्याबरोबरच ह्या घरांत सरस्वतीचा वास आहे–लक्ष्मीनें मात्र रुसवा धरला आहे हें लगेच मीं ताडलें !–काय कोटी कशी काय आहे ?

( श्रीपतकडे पहातो. )

**श्रीपत** : छान आहे.

**काणे** : मी गेलों त्या वेळीं बाबासाहेब आपली एकुलती एक लाडकी लेक सरस्वती आणि आपले भावी जांवई यांच्याशीं पुढल्या योजना आंखण्यांत दंग झाले होते–मांडीवर त्यांची नात–त्यांच्या दुर्दैवी मुलाची मुलगी खेळत होती. तिला बिचारीला त्या आनंदाची काय कल्पना ?–मुलगा तुरुंगांत आहे वगैरे कांहीं लिहिलं नाहीं मीं–

**शिद्‌बा** : बघूं–

**काणे** : हें बघा ना–म्हणजे खोटं नाहीं सांगत ! !

( **शिद्‌बा** ते कागद घेतो–आणि फाडून टाकतो. )

**काणे** : अहो हें काय ?

**शिद्‌बा** : आक्का, चा झाला कीं नाहीं अजून–( आंत जातो. )

**काणे** : कठीण आहे–

**श्रीपत** : माफ करा हं–

**काणे** : दॅटस् ऑल राइट्–पण मला जरा शंका यायला लागली आहे–

**श्रीपत** : काय ?

**काणे** : डोक्यावर कांहीं परिणाम नाहीं ना झाला त्यांच्या ? आमच्या एकशें दहाव्या कोड्याचं पाहिलं बक्षीस मिळालेली बाई एकदम मुकीच झाली–आणि तिच्या नवऱ्याला बायको मुकी झालेली पाहून हर्षवायु झाला. ती गप्प आहे आणि तो हंसतोय–नाहीं म्हणजे आम्हीं हें छापलं नाहीं, पण मला जरा चमत्कारिक संशय येतोय–

**संभा** : कसला ?

**काणे** : नाहीं म्हणजे रागावूं नका–पण डोक्यावर कांहीं तरी परिणाम झाला असावा त्यांच्या–बरं आहे–कॉंग्रॅच्युलेशन्स (अगदीं केविलवाण्या स्वरांत म्हणतो व जातो.)

**श्रीपत** : अहो, चहा घेऊन जा–

**काणे** : नको–जातों–नमस्कार– ( जातो. )

**शिदबा** : ( सरस्वती ताटांत तीन चार कप चहा घेऊन येते. ) हं दे त्यांना चहा. कुठं गेला ?

**श्रीपत** : ते जरा रागावूनच निघून गेले–

**शिदबा** : रागावले–कशाबद्दल ?

**श्रीपत** : तसं कांहीं नाहीं–आपण त्यांचा तो लेख फाडायला नको होता–

**सरस्वती** : कसला लेख ?

**संभा** : ( फाटलेला कागद उचलत ) हें बघ, लक्ष्मीचा सोन्याच्या पावलानें–

**शिदबा** : राहूं दे ते–चहा घे तो–

**श्रीपत** : नाहीं, पण आपण त्यांना आपला बेत सांगायला हरकत नव्हती–

**शिदबा** : कसला बेत ?

## अंक दुसरा

**श्रीपत** : नाहीं म्हणजे आपण जें ठरवलंय काश्मीरला जायचं–छोटीशी मोटार घ्यायची–

**शिदबा** : मोटार ?– मला भिकारड्याला काय करायची आहे मोटार !

**श्रीपत** : भिकारी ?–आतां आपल्याला गरीब कोण म्हणेल ?–शिवाय आपण ह्या सर्व गोष्टींना हो म्हणालांत–पांच दहा हजारांत सुंदर छोटी मोटार येईल–

**शिदबा** : म्हणजे मोटारींत बसून रद्दीचा धंदा करायला जाऊं काय मी ?

**सरस्वती** : पण बाबा आतां धंदा कशाला करायला पाहिजे ?

**शिदबा** : मग फुकटचं कोण खायला घालणार आहे मला–उद्यां लग्न झाल्यावर तूं जाशील नवऱ्याच्या घरीं–

**श्रीपत** : पण आतां त्याची चिंता कशाला बाबासाहेब ? तीस हजार रुपयांत आपणा चौघांना मजेंत रहातां येईल–

**शिदबा** : तीस हजार रुपये ! हजार लोकांचा संसार करायचा आहे मला त्या पैशांत–

**श्रीपत** : म्हणजे !

**शिदबा** : किती भुकेल्यांच्या पोटांत घास जाईल ह्या पैशांतून ! संभा, तीस हजार म्हणजे किती झाले ?

**संभा** : मला तर संभराच्या म्होरं आंकडाच मोजाया येत न्हाई !

**श्रीपत** : म्हणजे आपला काय बेत आहे बाबासाहेब ?

**शिदबा** : देव माझी परीक्षा घेतोय–

**श्रीपत** : आपण जरा विश्रांति घ्या–

**शिदबा** : विश्रांति–असा काय घा मैल हिंडून आलोंय काय मी–लताबाय, चल तागडी घे–

**सरस्वती** : म्हणजे रद्दी घ्यायला आजसुद्धां जाणार तुम्हीं !

**श्रीपत** : हा काय वेडेपणा बाबासाहेब–

**शिद्बा** : वेडच लागलंय मला–अरे द्रौपदीची थाळी धाडलीय पांडुरंगानं माझ्या घरीं–एकटाच खात बसूं–

**श्रीपत** : म्हणजे खरोखर तुम्ही हे पैसे दानधर्मात उडवणार ! !

**शिद्बा** : का दामाजीनं नव्हतीं कोठारं लुटायला सांगितलीं–तुकोबानं नाहीं सांगितलं–जे का रंजले गांजले त्यांसि म्हणे जो आपले–

**श्रीपत** : अस्सं ! म्हणजे साधु व्हायचंय तुम्हांला–

**शिद्बा** : साधु–त्यांच्या पायाची धूळ आहें मी–

**श्रीपत** : अहो पण तुकाराम बिकाराम अडाणी माणसं होतीं, त्यांचं काय सगळंच ऐकायचं असतं ?

**शिद्बा** : सगळं ऐकायची शक्ति नाहीं मला–ती असती तर कशाला पाहिजे होतं ! आणि तुकाराम अडाणी होता त्याच्यापेक्षां मी अडाणी आहें–

**श्रीपत** : पण हा गाढवपणा आहे–आयुष्यांत एवढी चैन करायची संधि आली आहे–

**शिद्बा** : चैन ! – पोराच्या दुधासाटीं चोरी करणाऱ्या आया–अनाथ लेकराच्या पोटांत घास घालतांना तुरुंगांत जाऊन बसलेला बाप डोळ्यापुढें दिसत असतांना–( लतेला जवळ घेतो. )

**श्रीपत** : छे !–ही दुबळी भावनाप्रधान वृत्ति झाली–त्यापेक्षां जनतेची संघटना करून बंड उभारलं पाहिजे–क्रांति केली पाहिजे–

**शिद्बा** : मग करा ! ! कुणी हात धरले आहेत तुमचे–

**श्रीपत** : पण तुम्ही तीस हजारांत देशांतलं असं काय दारिद्र्य नष्ट करणार ?

**शिद्बा** : मग म्हातारपणांत चैन तरी कसली करणार मी ?

**श्रीपत** : कां ? आपण काश्मीरला जाऊं–

**शिद्बा** : मला नाहीं कुठं जायचं–

**श्रीपत** : पंढरपूर काशीला जाऊन या तुम्ही–

**शिद्बा :** ( त्याच्या अंगांत "गाढव कुतरा ऐसा मज ठावा, बईल तूं देवा भारवाही" म्हणणारा तुकाराम संचारला आहे. ) तें बघा पंढरपूर माझं–तोच, तोच परीक्षा बघायला लागलाय माझी ( विठ्ठलाच्या तसबिरीकडे बोट दाखवतो. )

**श्रीपत :** बाबासाहेब–अगदीं चुकीचं तत्त्वज्ञान आहे हें !

**शिद्बा :** मग तुमचं काय म्हणणं–हे सगळे पैसे घेऊन चैन करायची आपण–

**श्रीपत :** चैन म्हणजे–व्यसनांत उधळायचे म्हणत नाहीं मी–पण आपण कांहीं तरी दुसरा धंदा काढूं हें भांडवल घेऊन–छापखाना, वगैरे–

**शिद्बा :** कशासाठीं ?

**श्रीपत :** म्हणजे तीस हजारांचे सहज लाख रुपये उभे करतां येतील–

**शिद्बा :** मग त्या लाखाचं काय करायचं ?

**श्रीपत :** छापखाना खूप मोठा करता येईल. व्यवस्थित धंदा केला तर–तीस हजारांच्या भांडवलांतून दहाबारा लाख रुपये उभे राहतील ! !

**शिद्बा :** होय–ते उभे राहतील आणि विचारतील–आतां काय करतोस माझं बोल ! ( आतां संतापानें म्हातारा थरथरूं लागला आहे. )

**श्रीपत :** असं कां म्हणतां आपण–मासिकांतून चारित्र येईल आपलं–"रद्दीवाल्याचा छापखानेवाला कसा झाला ! !"

**शिद्बा :** ह्या रद्दींत असलीं किती मोठी माणसं दाखवूं तुम्हांला श्रीपतराव ? मला नाहीं मोठं व्हायचं–मला लहानच व्हायचंय–

**संभा :** लहानपन देगा देवा मुंगी साखरेचा रवा–

**शिद्बा :** चल संभा–

**संभा :** कुठं ?–पैसं वाटायला काय ?

**शिद्बा :** अजून हातात काय आलंय–धंदा नको काय करायला ?

**सरस्वती** : बाबा, पण आज गेलंच पाहिजे का तुम्हांला ?

**शिद्बा** : आज काय आहे ?–नुसतं कधीं तरीं बसून खाल्लेलं आठवतं काय तुला ?

**श्रीपत** : पण आतां एवढ्या ऐश्वर्याचे धनी झाल्यानंतर काय गरज आहे राबायची–

**संभा** : जित्याची खोड आहे ती शिर्पतराव–ती अशी न्हाई सुटायची–

**शिद्बा** : चल–

( गोणपाट पाठीवर टाकतो–लता शिद्बा व संभा बाहेर जातात. )

**श्रीपत** : काय वेड लागलं कीं काय ह्या म्हाताऱ्याला !

**सरस्वती** : वेड ?

**श्रीपत** : शंकाच नको !–नक्की वेड लागलं. एकदम धक्का बसला–डोकं फिरलं म्हाताऱ्याचं–अरे अरे अरे– ( चौपाईवर बसतो. )

• • •

# अंक तिसरा

( स्थळ—पहिल्या अंकांतॉलच. श्रीपत रद्दींतल्या मासिकांची उलथा-पालथ करीत आहे. मधून मधून घड्याळांत पहातो. पुन्हां दार उघडून बाहेर जाऊन पहातो. एक मासिक घेऊन चाळूं लागतो—इतक्यांत दारांत पावलांची चाहूल ऐकूं येते म्हणून उठतो. नळावरून बादलींत पाणी भरून, व खांद्यावर लुगड्याचे पिळे टाकून सरस्वती येते. )

**सरस्वती** : आले नाहींत अजून बाबा !

**श्रीपत** : नाहीं ना—म्हणजे सगळा घोटाळा होणार आतां—

**सरस्वती** : पण मी तरी काय करूं ! ते ऐकेचनात मुळीं—

( बादली व पिळे घेऊन आंत जाते. )

**श्रीपत** : कांहीं तरी निमित्त काढून तूं घरीं ठेवून घ्यायला पाहिजे होतंस त्यांना—आतां डॉक्टर आले म्हणजे काय सांगायचं त्यांना ! छे !—मलाच वेड्याच्या हॉस्पिटलमध्यें जायची वेळ आली आहे—

**सरस्वती** : पण खरं सांगूं का ! ( बाहेर येते. )

**श्रीपत** : काय ?

**सरस्वती** : रागावणार नसलांत तर सांगतें !

**श्रीपत** : उगाच रागवायला तुझ्या वडलांसारखं वेड नाहीं लागलं मला— सांग कीं—

**सरस्वती** : तुमचं हें—मलाहि फारसं पटत नाहीं—

**श्रीपत** : काय तें ?—मग सगळे पैसे उधळूं देत म्हाताऱ्याला. मला तरी काय करायचंय ?

**सरस्वती** : पहा—शेवटीं रागावलांतच तुम्ही—

**श्रीपत** : आतां रागवूं नको तर काय करूं ? आयुष्यभर जिवाची आटापीट करून मिळणार नाहींत एवढे पैसे एकदम मिळाले आहेत आणि ही काय नाहीं ती दुर्बुद्धि सुचली तुझ्या बापाला ?

**सरस्वती** : मी किती परोपरीनं समजावून सांगितलं बाबांना—काकांनींहि सांगितलं—

**श्रीपत** : काका !—कोण काका ? हां तो चिकीवाला—

**सरस्वती** : होय. त्यांनींहि सांगितलं; पण बाबा ऐकायलाच तयार नाहींत कुणाचं. आतांपर्यंत दोनशें रुपये खर्च केले त्यांनीं भिकाऱ्यांना अन्न घालण्यांत—

**श्रीपत** : मग ठीक आहे. उभे राहूं या थाळी घेऊन त्यांच्या पुढें दे दाता करीत—

**सरस्वती** : मी तरी काय करूं सांगा तुम्हीच—मला नाहीं का वाटत आपलं एक सुंदर घर असावं—मला तर बक्षीस मिळाल्याचं ऐकल्यावर वाटत होतं कीं आधीं कुठें तरी छोटंसं घर बांधावं आणि लग्न झाल्यावर आपण दोघांनींहि त्या नव्या घरांतच जावं—

**श्रीपत** : मग अजूनहि आपण बांधूं शकतों—म्हाताऱ्याचं वेड एकदां सिद्ध झालं कीं सगळी रक्कम आपोआपच तुझ्या हातांत येईल. आपण कांहीं

त्यांच्याकडे दुर्लक्ष करणार नाहीं. त्यांना वेड्याच्या हॉस्पिटलमध्यें चांगली स्पेशल रूम घेऊन ठेवूं आपण.

**सरस्वती :** वेड्यांच्या हॉस्पिटलमध्यें ? नको नको–

**श्रीपत :** हें बघ सरोज–घाबरूं नकोस–मी डॉक्टरना सांगितलं–डॉक्टर म्हणाले एकदम शॉक झाला आहे त्यांना–त्यामुळें त्यांच्या डोक्यावर परिणाम झाला असेल–महिन्या दोन महिन्यांत पुन्हां ठीक होतील म्हणाले डॉक्टर–आतां प्रत्यक्ष येऊन एकदां त्यांनीं पाहिलं म्हणजे हॉस्पिटलमध्यें केव्हां न्यायचं वगैरे ते सांगतीलच !

**सरस्वती :** पण त्यांना वेड लागलं आहे हें नक्की का ?

**श्रीपत :** आतां डॉक्टरना मी सगळ्या हकीगती सांगितल्या–त्यांनीं हा कसलासा फोबिया आहे म्हणून सांगितलं. त्यांत म्हणे माणसाला औदार्याचा झटका येतो.

**सरस्वती :** पण बरे होतील ना बाबा ?

**श्रीपत :** अग नक्की–आणि बरे झाल्यावर बघ–एका भिकाऱ्याला जवळ उभा करणार नाहींत–

**सरस्वती :** खरं–

**श्रीपत :** खरं म्हणजे ? डॉक्टरांचेच शब्द सांगतोय मी–सरोज, बाबांची ही अवस्था पाहून मला तरी आनंद होतोय असं वाटतं का तुला ! का तुला असं कांहीं वाटायला लागलंय कीं त्या तीस हजार रुपड्यांसाठीं मी बाबांना मुद्दाम वेडा ठरवायला लागलोंय–

**सरस्वती :** छे छे–असं कुठें म्हणतें मी–

**श्रीपत :** तूं म्हणत असशील तर आजपासून हा विषय सोडला–पण आपला भावी सासरा वेडा झाला आहे–उद्यां सगळे पैसे भिकाऱ्यांना वाटून संपले म्हणजे रस्त्यांतून येणाऱ्याजाणाऱ्याच्या खिशांतून पैसे काढतो आहे–कोणी त्याला मारताहेत–पोलीस पकडताहेत–कोणी गळ्यांत फाटक्या जोड्यांची माळ टाकून

साधुमहाराज म्हणून हिणवायला लागले आहेत हें चित्र डोळ्यांपुढें आलं म्हणजे—

**सरस्वती :** थांबा—श्रीपतराव, मला भीति वाटायला लागली आहे—

**श्रीपत :** घाबरूं नकोस—माझ्याकडून होतील तितके प्रयत्न मी करतों आहें—तुझा विश्वास नसेल तर त्या तीस हजार रुपयांतल्या एका दमडीलासुद्धां मीं स्पर्श करणार नाहीं असं लिहून देतों तुला—

**सरस्वती :** छे छे—विश्वासाचा प्रश्न नाहीं—आणि जिथें विश्वासानं माझं सर्वस्व मीं तुमच्या पायाशीं ठेवलं आहे—तिथं मला असला संशय येईल तरी कसा !

**श्रीपत :** त्या तुझ्या विश्वासाला—त्या दिव्य पवित्र प्रेमाला धक्का लागेल असं माझ्या हातून कांहींहि घडलं तर त्या क्षणीं मी आत्महत्या केल्याशिवाय रहाणार नाहीं—

**सरस्वती :** असलं कांहीं तरी बोलूं नका—शीः ! कशाला आलं हें बक्षीस असं झालंय मला—

**श्रीपत :** खरं म्हणशील तर मला सुद्धां असंच वाटतंय—वास्तविक कुठं तरी नदीच्या कांठीं एखादं लहानसं झोपडं बांधून आपण दोघांनीं रहावं—लहान मुलांसाठीं एक आश्रम काढून चालवावा असं वाटत होतं मला—सकाळच्या वेळीं—नदीच्या कांठाकांठानं—कांठाकांठानं उगवत्या सूर्यकिरणांचे नदीच्या खट्याळ पोरींशीं चाललेले खेळ पहात जावं—पांखरांचीं गाणीं ऐकून डोलणाऱ्या वृक्षराजांना मुजरा करीत वनराणीच्या दरबारांत हळूच जाऊन बसावं—

**सरस्वती :** जिभेवर तर सरस्वती नाचते तुमच्या—

**श्रीपत :** जिभेवरच कां ! साक्षात् सरस्वती प्रसन्न झाली आहे कीं मला—

**सरस्वती :** तर ! गेल्या जन्मीं काय उसाचे मळे लावीत होतां कीं काय कोण जाणे—आणि वनराणीच्या दरबारांत तुम्ही एकटेच जाणार होय ! वा ! ! मी देखील हळूच येईन तुमच्या मागून आणि तिथल्या फुलाफुलांना—कळ्याकळ्यांना सांगेन—

माझ्याच साठीं फुला  फुलांनो वेलींवरी
वसंत आला मनीं  वसंत घरीं दारीं ।

वाहत्या ओहळांनो  माझेंच गीत म्हणा
माझ्याच सूरासंगें  वाऱ्याची वाजे वीणा
साळुंकी मैना गाती  माझीच आसावरी ।

माझ्याच साठीं फुला  फुलांनो वेलींवरी
वसंत आला मनीं  वसंत घरीं दारीं
उतरा देवतांनो  गुंफा ग कळ्या कळ्या
दवांचे थेंब जोडा  जडवा मुंडावळ्या
लाव ग उषामाई  कुंकुम भाळावरी ।

माझ्याच साठीं फुला  फुलांनो वेलींवरी
वसंत आला मनीं  वसंत घरीं दारीं
मनाच्या मुहूर्तानें  सोन्याची घडी येते
वसंत वासंतीचें  फुलांनीं जडे नातें
कोंवळ्या पालवीची  अक्षता अंगावरी ।

( गाणें संपतें. दारावर टकटक—सरस्वती दार उघडते. डॉक्टर कुळकर्णी येतात. स्थूल, मध्यमवयीन गृहस्थ, हातांत बॅग—)

**श्रीपत** : या !—सरोज हे डॉक्टर कुळकर्णी—मानसिक रोगांचे डॉक्टर आहेत हे—

( **सरस्वती** नमस्कार करते. )

**डॉक्टर** : नमस्कार.

**श्रीपत** : जरा जपूनच बोल हं ह्यांच्याशीं—नाहींतर आपलीच मानसिक व्यथा कळायची ह्यांना—

**सरस्वती** : इश्श !

**डॉक्टर** : आपल्या पत्नी—

**श्रीपत** : झाल्या नाहींत अजून—

**डॉक्टर** : हो ! म्हणाला होतां तुम्ही मला—आठवणच रहात नाहीं बघा—काय झालंय कांहीं कळत नाहीं—

**श्रीपत** : वा ! तुम्हांला तर कळायला पाहिजे—

**डॉक्टर** : ( चपापतात ! सांवरून— ) हो—नाहीं म्हणजे तसं कळूं शकतं—ब्रेनचा मेमरी स्टोअर एकदम एक्झॉस्ट होतो कधीं कधीं—हं— ( चौपाईवर बसत ) आपल्या वडलांची केस सांगितली ह्यांनीं—व्हेरी अनफॉर्च्युनेट—सेरेब्रोब्रेनि व्हॅलंटोफोबिया म्हणतों आम्ही असल्या डिसीजला—

**सरस्वती** : पण बरे होतील ना बाबा ?

**डॉक्टर** : वेल्—आय होप सो—मी शक्य तितका प्रयत्न करून पाहीन—पण लक्षावधि लोकांमध्यें एखाद्यालाच हा रोग होतो—म्हणजे सूडोसेंटिमेंटॅलिस्टिक आउटलुक फार डेव्हलप व्हायला लागला म्हणजे होतं असं कधींकधीं—फार इंटरेस्टिंग स्टडी असतो असल्या केसिसचा ! मला विचाराल—म्हणजे इफ यू आस्क मी—तर असल्या पिक्यूलिअर केसिस हँडल् करायला मला फार आवडतात—असली केस हातांत आली म्हणजे अगदीं वेड्यासारखा त्या केसच्या मागें लागतों मी—किती ! तीस हजारांचं बक्षीस मिळालं काय तुमच्या वडलांना ?

**सरस्वती** : हो !

**डॉक्टर** : आतां कुठं बाहेर गेले आहेत वाटतं ?

**श्रीपत** : होय ! ! मीं सांगितलं होतं हिला त्यांना जाऊं देऊं नकोस म्हणून पण ते कांहीं ऐकेनात—

**डॉक्टर** : कुठें गेले आहेत ते आतां—

**श्रीपत** : हेंच—भिकाऱ्यांना दक्षणा वाटायला—

**डॉक्टर** : आं ! खरंच पण माझ्या फीज सांगितल्या आहेत ना ह्यांना—

**श्रीपत** : त्याची आपण मुळींच काळजी करूं नका डॉक्टरसाहेब–

**डॉक्टर** : नाहीं– तसं नाहीं– काय आहे कीं असल्या रोग्यांच्या बाबतींत फार लक्षपूर्वक ट्रीटमेंट द्यावी लागते. अगदीं डॉक्टरला वेड लागायची पाळी येते. एक विशिष्ट प्रकारची ट्रीटमेंट आहे ही !– आधीं रोग्याला नुसतं बोलूं द्यायचं– खूप बोलूं द्यायचं– त्यावरून बराच पत्ता लागतो– माइंडचं वर्किंग कुठल्या डिरेक्शननं चाललंय ह्याचा– आणि मग एकदम शॉक द्यायचा– शॉकमुळें वेड लागलंय्–एकदम कसला तरी शॉक दिला– भीति दाखवली म्हणजे पटकन् बरा होण्याचा चान्स असतो– घाबरूं नका हं– कदाचित् मला त्यांच्याशीं दंगामस्तीहि करावी लागेल– ! ! बरं मग जाऊं मी– ते घरीं आले म्हणजे मला गाडी पाठवा मी येईन– ( दाराची कडी वाजते. )

**सरस्वती** : आलेच वाटतं– ( कडी उघडायला जाते. )

**डॉक्टर** : थांबा– तुम्ही आंत जा– मला त्यांना ऑब्झर्व करूं द्या– तुम्ही आजिबात बाहेर येऊं नका–

[ सरस्वती व श्रीपत आंतल्या खोलींत जातात. डॉक्टर लगेच बाहेरून कडी लावून घेतात व बाहेरच्या दाराची कडी आपण काढतात. संभा येतो. परक्या माणसाला पाहून जरा थबकतो. डॉक्टर त्याच्याकडे रोखून पहात आंत येतात. संभाहि डॉक्टरचा तो अवतार पाहून बुजत बुजत आंत येतो. दोघेहि थोडा वेळ एकमेकांकडे पहात स्वस्थ बसतात. ]

**संभा** : रामराम– कोन आपन ? ( डॉक्टर कांहींच बोलत नाहींत, असें पाहून ते बहिरे असावेत असा समज करून घेतो व जरा मोठ्यानें विचारतो.) आमच्या मास्तरीनबाईच्या साळंत असतां काय ? ( तरीहि डॉक्टर बोलत नाहींत. ) ऐकायला कमी येतंय वाटतं– ( आंतून श्रीपत कडी वाजवतो. )

**सरस्वती** : ( आंतून ) डॉक्टर–

**डॉक्टर** : तुम्ही स्वस्थ बसा पाहूं–

**संभा** : आं– म्हंजे आका आंतच हाय व्हय ( आंत जाऊं लागतो. )

**डॉक्टर** : स्वस्थ बसा जागेवर–

**संभा** : भले ! अग आका– ह्यो कोन येडा शिरलाय बग घरांत– ( कडी काढायला जाऊं लागतो. डॉक्टर एकदम त्याला ढकलतो. )

**डॉक्टर** : बसा गपचूप जागेवर.

**श्रीपत** : ( आंतून ) अहो डॉक्टर– ते गृहस्थ दुसरे आहेत– हे बाबा नव्हेत–

**डॉक्टर** : ऑं– कोण तुम्ही ?

**संभा** : तुझा बा ! ! तू कोन ? माझ्या घरांत शिरून लेका माझ्याशीं दंगामस्ती ? ( अस्तन्या वर सारतो. )

**सरस्वती** : ( आंतून ) संभाकाका, कडी काढा अगोदर–

**संभा** : चोरा ! ! घरांतल्या मानसान्ला कडीकुलपांत घालून चोरी करायला शिरला होतास काय ?

**डॉक्टर** : अहो नाहीं– मी डॉक्टर आहे–

**संभा** : डाक्टर ? कसला ? छत्र्या दुरुस्त करनारा डाक्टर काय ?

**सरस्वती** : संभाकाका दार उघडा अगोदर ( आंतून दारावर थाप मारते. )

( संभा दार उघडतो. श्रीपतराव त्याला धरतात. )

**श्रीपत** : अहो–वेड्यांचे डॉक्टर आहेत ते–

**संभा** : मग हितं कशाला आला ? कोनाला येड लागलाय हितं ?

**सरस्वती** : बाबांना नाहीं का काका वेडाचा झटका आलाय्–

**संभा** : कधीं ?

**सरस्वती** : त्याशिवाय का पैसे वाटीत सुटले आहेत ते–

**संभा** : ह्यॆंच येड होय ?– त्ये बगतों मी बराबर– अग तुज्या बाची मला कांहीं काळजी हाय का न्हाइ–

**श्रीपत** : अहो पण हे वेड्यांचे डॉक्टर आहेत– ह्यांना वेड बरं करतां येईल का तुम्हांला ?

**संभा** : अहो पन ह्यानला येडा आनि शाना मानूस वळखायला येत न्हाइ आनी येड काय घालिवनार ह्ये ?

**श्रीपत** : त्याच्याशीं तुम्हांला काय करायचं आहे ? डॉक्टरसाहेब, माफ करा हं–

**डॉक्टर** : पण ह्यांच्यांतहि एक मॅडनेसची स्ट्रीक आहे–

**संभा** : काय ?

**डॉक्टर** : नाहीं– कांहीं नाहीं–

**संभा** : शिर्पतराव, ह्यान्ला आवरायला सांगा– आतां म्हातारा येईल. उगाच खुळ्च्येटासारं ह्यो काय तरी बोलल त्याला– म्हाताऱ्याचं चित्त आदुगरच खवळलंय– नरडं दाबायचा त्यो ह्याचं–

**सरस्वती** : काय झालं बाबांना–

**संभा** : काय व्हनार ? मीं सांगितल्यालं पटलं त्याला–

**श्रीपत** : काय तें ?

**संभा** : अहो म्हातारा मनाचा दिलदार हाय– पर दिलदारी दाखवाया जागा कुठं हाय–

**श्रीपत** : म्हणजे ?

**संभा** : म्हंजे काय ते कळल– तुमची बाकी कमाल हाय शिर्पतराव– लगीच म्हाताऱ्याला येडा ठरवून पार ! !

**श्रीपत** :– मग वेडच नाहींतर काय आहे ? कुठला गाढव एवढा पैसा हातांत आल्यावर भिकाऱ्यांना वाटायला निघेल ?

**संभा** : मानतो मी– पर म्हनून काय त्याला खऱ्या येड्यांत काडायचा ? म्या नाहीं त्येचा गाडावपना लख् दाखवून दिला त्येला–

**सरस्वती** : म्हणजे ?

**संभा** : म्हजे- योक तांबडा: पैका न्हाइ देनार त्यो भिकाऱ्याच्या हातावर-

**श्रीपत** : काय म्हणतां ?

**संभा** : बुकांतलं शानपन न्हाई आमचं शिर्पतराव- उगड्या डोळ्यानं समद्या जगाचा तमाशा बगतों आम्ही- (चौपाईवरच्या पानसुपारीच्या साहित्यामधून सुपारी काढतो व अडकित्त्यानें कातरीत बोलतो.) भिकाऱ्याचा कळवळा आला म्हताऱ्याला- योक तीळ साता जैनांनीं वाटून खावा ह्ये खरं- पर ह्यो काय गाडावपना-

**श्रीपत**- म्हणजे आतां ते भिकाऱ्यांना पैसे देत हिंडत नाहींत ?

**संभा** : काय बिशाद आहे दिईल ! !

**श्रीपत** : मग ? काय करणार आहेत त्या पैशाचं आतां-

**संभा** : करल काय तरी. त्येचा पैसा हाय- त्यो बगून घेतुय काय करायचं त्ये- तुम्हां आम्हांला कशाला त्येची काळजी ? पर असा फुकट्या लोकांना गिळाया न्हाई गावायचा-

**श्रीपत** : मग ? मी तरी हेंच म्हणत होतों- पैसे आले आहेत- चांगलं झकास घर घेऊन रहावं-

**संभा** : काय करायचंय घर ? मी लागलोंय त्याच्या मागं मळा घे ! ! राबनारी जात हाय त्याची- जीव जायाच्या दिसापावतर राबनार त्यो- आनि मरतानी आपुन जाऊन घोंगडीवर पडल आनी सांगल बाबाहो मी म्येलों आतां उचला मला ! !

**सरस्वती** : काय बोलतां हें काका-

**संभा** : काय चुकलं ग ? आज तुमच्या हातांत पैसं दिलं त्यानं समदं- तुम्हीं बांदला बंगला. मोटार घेतली आनि उद्यां राजारानीच्या सौंसारांत

म्हाताऱ्याची आडचन व्हाया लागली आनी तुम्ही घालिवलं म्हताऱ्याला, कुठं जायाचं त्येनं ?–भीकच मागायची का न्हाई ?

**सरस्वती** : तर ? बाबांची माया काय ती तुम्हांलाच आहे ? मला नाहीं ?

**संभा** : तुला मस्त हाय ! ! पर लगीन झाल्यावर तू बाबाची लेक न्हाइ ऱ्हानार पोरी–ह्येची बाईल होशील. चार लाता घातल्या दादल्यानं मंजी गुमान सांगशील–बाबा–तुमच्या पायांत लाता खातें मी–काय करतां बोला–

**श्रीपत** : तर ? अगदीं अडाणीच कीं नाहीं ? पैशाला कांहीं इतके हपापलों नाहीं आम्हीं–

**संभा** : तसं नसतं–तर त्येला येडा करन्याच्या लफड्यांत पडला नसता–

**श्रीपत** : म्हणजे–आम्हीं मुद्दाम वेडे ठरवतोय कीं काय बाबासाहेबांना ?

**संभा** : न्हाईतर ह्याला कशाला आनलाय ? शिदबा काय–काय दगड माराया लागला का नेसूचं सोडून डोचकीला गुंडाळलं त्येनं–शिर्पतराव तुम्ही धा बुकं जास्त वाचलीं असत्याल पर मी ईस पावसाळं जास्त बगितल्यात– पैशासाठीं मानूस काय करील–काहीं नाहीं सांगतां येत–

**श्रीपत** : शी ! सरोज–हा माझा अपमान आहे–

**डॉक्टर** : फारच अन्‌कल्चर्ड माणसं दिसताहेत ! काय नशीब आहे बघा ! असल्या लोकांना तीसतीस हजाराचीं बक्षिसं मिळतात ! आणि आम्हीं आज दहा वर्षे क्रॉसवर्ड पाठवतोंय्–अकराच्या खालीं चूक नाहीं–मिस्टर सासवडकर तुम्हीं कां काळजी करतां ? श्रीमंत व्हायचं नशिबांतच नाहीं ह्या लोकांच्या ! पांच रुपये मिळोत, नाहींतर पांच हजार रुपये मिळोत ह्यांचं लाइफ हें असंच रहायचं–शेवटीं भिकारडे ते भिकारडे ! !

**सरस्वती** : खबरदार ! ! कोण भिकारडे ?

**डॉक्टर** : नाही–म्हणजे तुम्हांला नाहीं म्हटलं मीं–(संभाकडे बोट दाखवून) ह्यांना.

**सरस्वती** : हे भिकारडे ? काय अधिकार आहे तुम्हांला ह्यांना भिकारडे म्हणायचा ?

**श्रीपत** : तूं कां रागावतेस पण ?

**सरस्वती** : तुम्हांला ह्यांचा राग येत नाहीं म्हणून–माझ्या बाबांना–माझ्या काकांना भिकारडा म्हटलेलं मला नाहीं खपायचं–आकाशाएवढीं अंतःकरणं आहेत त्यांचीं–त्यांना भिकारडे म्हणतां ? ( डॉक्टरला )–जा ! ! चालते व्हा माझ्या घरांतून–काका, फेकून द्या त्यांचीं बॅग ! !

**श्रीपत** : अग काय तुझं डोकं बिकं फिरलं आहे कीं काय ? एवढा कसला उन्मत्तपणा आलाय तुला ?

**सरस्वती** : तीस हजार रुपयांचा ! ! झालं समाधान ? जा त्यांना घेऊन ! बाबांना कितीही वेड लागलं तरी हरकत नाहीं. मी सेवा करीन त्यांची ! काका फेकून द्या म्हणतेना त्यांची बॅग–

**संभा** : डाक्टर–

**डॉक्टर** : ( बॅग उचलतो. ) हो–

( दार उघडून शिदबा आंत येतो. )

**सरस्वती** : बाबा– ( एकदम त्याला मिठी मारून रडूं लागते. )

**शिदबा** : काय झालं ग पोरी– ( डॉक्टरकडे लक्ष जातें ) हे कोण ?

**डॉक्टर** : कोणी नाहीं ! ! ( एकदम निघून जातो. )

**शिदबा** : आं ! श्रीपतराव–तुमचे कोण पाहुणे होते ?

**संभा** : अव कुठला पाव्हना ? अत्तर इकनारा आला होता. तूं पैशेवाला झाल्याची खबर दुनियेला कळली आतां–समदीजनं जमनारच कीं तुला लुबाडायला–

**शिदबा** : आक्का–तुला काय झालं ग रडायला ?

**सरस्वती** : कांहीं नाहीं–

**शिदबा** : श्रीपतराव– ( श्रीपतराव गप्प ! )

**संभा** : शिदबा–यकदा लवकर लगीन उरका ह्यांचं–आतां हक्कानं तरी भांडूं देत ! ह्यें काय खरं न्हवं–

**शिदबा** : होय--

**संभा** : व्हय एकदां लगीन होऊन पोरगी दादल्याच्या घरीं गेली नांदाया म्हंजी सुखानं खेड्यावर जा आनि बस मळा पिकवीत–

**श्रीपत** : मळा ?

**संभा** : तुमी बी जावा सुटींत–अडून मडून निवान्त आराम करायला मळ्यावर !

**श्रीपत** : म्हणजे ? मळा घ्यायचं ठरलं तुमचं ?–आणि मग त्या अन्नदान-यज्ञाचं काय झालं ?

**शिदबा** : ( भाबडेपणानं ) कशाचं ?

**श्रीपत** : नाहीं–तीस हजार रुपयांचे घास उपाशी भिकाऱ्यांच्या पोटीं घालायच्या व्रताचं काय झालं ? संतपदाची जोड नाहीं का करायची ?

**सरस्वती** : थांबा–काय वाटेल तें बोलूं नका !

**शिदबा** : बोलूं दे ! बोला श्रीपतराव तुमची जीत झाली आहे !

**श्रीपत** : माझी जीत ?

**शिदबा** : होय तुमची जीत ! मी हरलों !

**श्रीपत** : म्हणजे तुमचे तुकोबा–ज्ञानदेव--सगळे हरले कीं काय ?

**शिदबा** : त्यांचं काय सांगूं मी ?–पण मी मात्र हरलों !

**सरस्वती** : काय म्हणतां तुम्ही बाबा–

**शिदबा** : काय सांगूं पोरी–माझे दोनशें रुपये पाण्यांत गेले ! ( संभा हसतो. ) हस बाबा पोटभर हसून घे !

**सरस्वती** : काय झालं काका सांगा ना–

**संभा** : सांगूं दे कीं तुझ्या बाबाच ! धर्माचा अवतार घेऊन ग्येला होता–काय झालं इचार ! !

**शिदबा** : काय सांगूं ! हसावं कीं रडावं हेंच कळेनासं झालंय—वाटतं हे पैसे घ्यावेत आणि काडी लावून जाळून टाकावे !

**संभा** : ह्ये झाक ! ! पैस जाळावं—त्याची राख फासावी आंगाला ! आनि त्याच भिकाऱ्यांच्या रांगत जाऊन आंधळयाला दाता दे भगवान् म्हनत थाळींत किती दिडक्या जमल्या ते हळूच डोळं उघडून बघावं—

**सरस्वती** : म्हणजे—कोणी फसवलं तुम्हांला ?

**शिदबा** : अग सगळेच फसवायला निघाले आहेत—

**संभा** : का आतां पटलं कीं न्हाई ?

**शिदबा** : पटलं बाबा पटलं. गुरु आहेस ! !

**संभा** : मग घ्या आतां मळा—

**श्रीपत** : मी घेऊं देणार नाहीं—

**शिदबा** : मी थोडाच घ्यायला निघालों आहें !

**श्रीपत** : मग काय करणार आहांत एवढ्या पैशाचं ?

**सरस्वती** : पण बाबा—तुम्ही आधीं ठरवलं होतं तें काय वाईट होतं ?

**श्रीपत** : सरोज !

**सरस्वती** : एक अक्षर बोलूं नका !—चला बाबा मला येऊं द्या तुमच्या बरोबर—भुकेल्या जीवाला अन्न मिळाल्यावर त्याच्या चेहऱ्यावर दिसणारा आनंद मला तरी बघूं द्या !

**शिदबा** : भुकेले जीव ! थोबाड फोडून औताला जोडले पाहिजेत एकेकाला.

**सरस्वती** : म्हणजे खरंच दानधर्म करायचा नाहीं असं ठरवलंय तुम्हीं—

**शिदबा** : कांहीं कळेनासं झालंय मला ! दानधर्म कोणाला करूं ?—चोर कुठला आणि साव कुठला ओळखायचं कसं ?

**संभा** : आक्का, मी सांगतु काय झालं तें ! ह्येला घेऊन गांवांतले निम्मे भिकारी निस्ते दाखवले. शिदबा, सकाळचा आंधळा ? मी बराबर हेरला

त्याला. म्हाताऱ्याला लय दया आली त्याची. आठ आन्याचं पैसं टाकलं थाळींत–मी दाटूनच म्हटलं! शिदबा–आठ आने!–लागलीच डोळं उघडलं त्या आंधळ्यानं–

**शिदबा** : लफंगे!!

**संभा** : अग योक शिनिमा चुकवत नाहीं त्यो आंधळा. मी चिकी इकालिया त्याला हजार वक्ती–

**शिदबा** : आका–भीक मागायचा सुद्धां धंदा केलाय ग ह्या चांडाळांनीं!! ह्या संभानं कुठं कुठं काय काय पाहिलंय देव जाणे! एका रक्तपितीनं भरलेल्या भिकाऱ्याच्या अंगावर गेला आणि त्याच्या हाताची वहाती जखम सरळ आपल्या हातांनीं पुसली–तो लागला बोंबलायला–मला ह्यानं आपला हात दाखवला–ह्याच्या हाताला सगळा रंग लागलेला. पहाणाऱ्याला वाटावं सगळ्या हातावर जखमा आहेत–पण सगळ्या रंगवलेल्या जखमा–साधु, संन्याशी, बैरागी फटके मारून कामाला जुंपले पाहिजेत एकेकाला!

**श्रीपत** : पटलं ना आतां?

**संभा** : पन शिर्पतराव, समदेच भिकारी असे असत्यात असं न्हाई बर का? खरे भिकारीबी हाईत–

**श्रीपत** : मग त्यांची काळजी समाजानं घ्यावी–

**सरस्वती** : पण समाज म्हणजे आपणच ना?

**शिदबा** : खरं आहे!

**श्रीपत** : पण समाजांतल्या मोठ्या लोकांचं काम आहे हें–

**शिदबा** : अरे पण ह्या तीस हजार रुपयांनीं मला आलाय ना हा मोठेपणा–

**श्रीपत** : मग काय करायचं ठरवलंय तुम्हीं ह्या पैशांचं?

**शिदबा** : कांहीं सुचेनासं झालंय मला! दळिद्र तर दिसतंय–अडलेनडलेले लोक दिसताहेत–

**श्रीपत** : आपल्याला काय करायचंय त्याच्याशीं–

**शिद्बा :** असं तुमच्यासारखं मला वाटलं असतं तर सुखानं खात बसलों असतों हो ! पण मी एकटा हे पैसे खात बसलों तर अंगावर वण उठतील असं वाटायला लागलंय मला—काय करूं—माझ्या कमाईतून नाहीं आला हा पैसा ! ही आक्का—लग्न न करतां हिला मास्तरीण केली म्हणून चाळींतले लोक हसतात मला ! पण मी नाहीं पर्वा करीत. म्हटलं लग्न झाल्यावर ती नि तिचा नवरा काय वाटेल तें करूं देत ! तोंवर कमावून खाऊं दे ! कमावून खावं माणसानं. आयत्या पैशावर जगूं नये !

**श्रीपत :** पण हे पैसे काय कुठून चोरून आणले नाहीं तुम्हीं—

**शिद्बा :** खरं सांगूं ? ह्या संभाला विचारलं मी—अरे हे एवढे पैसे द्यायला परवडतात कसे ह्या पेपरवाल्यांना—

**श्रीपत :** कां ? अनेक लोक कोडीं पाठवतात—

**शिद्बा :** होय आणि आशेवर बसतात कीं आपल्याला तीस हजार रुपये मिळणार. लाख लाख लोक पाठवतात म्हणे—

**संभा :** जास्त पन कमी न्हाइ—

**शिद्बा :** घ्या ! इतक्या लोकांचा तळतळाट मला बाधायचा ! ! इतक्या लोकांच्या आशेची राख झाली आणि त्यांतून माझ्या घरांत हा पैसा आला. श्रीपतराव, इतक्या लोकांचा हा पैसा आहे, माझा नाहीं—

**श्रीपत :** मग जा त्या लोकांच्या घरीं नेऊन द्या—

**शिद्बा :** शक्य असतं तर केलं असतं मीं—म्हटलं असतं—बाबांनो, घ्या हे तुमचे पैसे ! कोणाच्या शापावर जगायचं नाहीं मला—काय घसा फोडून रद्दी जमा करून विकेन त्याच्यावर भागतं माझं पोट ! बरोबर काय घेऊन जायचंय जातांना—

**संभा :** आतां आधीं मळा घे, मी सांगतु तसा मरेपत्तर राब—ऊस पिकीव आनि मरतांनीं नातवाच्या नांवावर करून दे—

**श्रीपत :** हो ! म्हणजे ज्याचा अजून जगांत पत्ताहि नाहीं त्याच्या नांवावर—आणि त्याचे आईबाप राहूं देत उपाशीं—

**संभा** : का ? मास्तरकींत पोट भागत न्हाइ ! आतां तर काय लगीन झाल्यावर घरांत दोघं कमावनार–

**श्रीपत** : लग्न झाल्यावर मी सरोजला नोकरी करूं देणार नाहीं !

**संभा** : कां ?

**श्रीपत** : बायकांनीं कामं करणं आवडत नाहीं मला–

**सरस्वती** : पण मी नोकरी सोडून नुसती घरांत भांडींधुणीं करीत बसूं वाटतं–

**श्रीपत** : मोलकरणीचीं कामं तुला करायला सांगायला काय अक्कल गहाण टाकून नाहीं आलों मी. लग्न झालेल्या बायकांनीं घरं सांभाळावीं नीट !

**संभा** : आनि उद्या समद्या मोलकरनींच्या नवऱ्यास्नी असंच वाटलं म्हंजी ! शिदबा, ऐका तुमच्या जांवयाचा शानपना–

**शिदबा** : मला कुणाचाच शहाणपणा कळेनासा झाला आहे ! ! कांहीं झालं तरी तो पैसा पापाचा आहे असं वाटायला लागलं आहे मला ! !

**लता** : ( धांवत येऊन ) आजोबा ! ! आजोबा–आक्काचं लग्न आहे कीं नाहीं हो ! !

**शिदबा** : आहे हं ! !

**लता** : ( दारांत धांवत जात ) बघ आहे कीं नाहीं ! कशी जिरली मिमीटलीची. आजोबा, ती मिमी आहे कीं नाहीं नकटी–तिच्या ताईचं लग्न आहे–मीं म्हटलं आमच्या आक्काचं मुद्धां आहे ! तशी नाहीं म्हणाली–आहे कीं नाहीं हो लग्न !

**शिदबा** : हो आहे तर ! !

**लता** : मग लग्न झाल्यावर आक्काला एक बाळ मिळणार कीं नाहीं हो एवढंसं ! !

**सरस्वती** : लते !

**शिद्बा** : गप ग ! पोराला काय कळतय त्या ! होय ! आणि लताबाई बाळ मिळणार नाहीं—बाळ होणार म्हणायचं—

**लता** : आहा—वेडे कुठले ! ! दवाखान्यांत बाळ मिळतं पैसे दिले कीं—

**शिद्बा** : कोणीं सांगितलं तुला ?

**लता** : माझ्या बाबांनीं—माझी आई कीं नाहीं—बाळ आणायला गेली होती दवाखान्यांत, पण तिला आंतच येऊं दिलं नाहीं—आणि आजोबा, तिथं आई मेली माझी—

**शिद्बा** : चूप असं बोलूं नये ! कोण तरी काय तरी सांगतं बघ पोरांना.

**लता** : पण खरं—अगदीं गळ्याशपथ—तुमाला कळत नाहीं—भिमीनीं सांगितलं मला. दवाखानेवाल्याला पैसे दिले तरच बाळ मिळतं म्हणे—आईकडे पैसे नव्हते—बाबा गेले होते पैसे आणायला—

**शिद्बा** : लता ! ! ! पोरी— ( तिला जवळ घेतो. ) संभा—पैशाला वाट सांपडली माझ्या—

**संभा** : म्हंजे ?

**शिद्बा** : हें ढोंग नाहीं करतां यायचं कुणाला !

**सरस्वती** : कसलं ढोंग बाबा ?

**शिद्बा** : बाळंतपणाचं—श्रीपतराव एक उपकार करा—बाळंतपणाचा मोफत दवाखाना कुठं आहे ?

**श्रीपत** : काय करायचाय तो ?

**शिद्बा** : हे तीस हजार रुपये त्या दवाखान्याला देणार मी ! ! तिथं अडलेल्या बाया येतील, फुकट बाळंतपण होईल त्यांचं—तिथं लबाडीला जागा नाहीं—आक्का, जातीं मी—

**सरस्वती** : ( गहिंवरून ) जा—जा बाबा—

**श्रीपत** : काय जा ? ( संभाला ) अहो, तुम्ही तरी सांगा—

**संभा** : आमचं शानपन संपलं आतां ! शिदबा देवाच्या दुनियेंतला मानूस तूं हितं कसा जल्माला आलास– ( त्याला दंडवत घालतो. )

**शिदबा** . अरे हें काय वेड्या ! ! श्रीपतराव, तुमचं बरोबर आहे ! एकट्या दुकट्याच्या हातून लोकांचं भलं होणं कठीण आहे ! पण दहा शहाणीं माणसं जमून भलं करतात त्यांत जाऊन उभं राहिलं पाहिजे आपण ! राम देव होता–एका बाणानं दर्या हटवतां येत होता त्याला–पण हजार वांदरांच्या हातानं सेतू बांधला त्यानं–चिमण्या खारकुंडीची मातीसुद्धां मोलाची ठरली–श्रीपतराव लाखोपतींच्या दुनियेंत तीस हजार खारखुंडीच्या मातीसारखे आहेत–पण रामाचं नांव घेऊन काम करणाऱ्या माणसांत जाऊं दे हा पैसा–सांगा कुठं आहे मोफत दवाखाना–मला लवकर मोकळं करा ह्या ओझ्यांतून–

**संभा** : चला मी दाखिवतों– ( शिदबा आणि संभा जातात. )

( सरस्वतीच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंच्या धारा. श्रीपत भयंकर संतापला आहे. लता त्या दोघांकडे पहात आहे. )

**श्रीपत** : का ! आपल्याला खूप आनंद झाला असेल आतां !

**सरस्वती** : आनंद ! मला नाचावंसं वाटायला लागलंय. काय करावं कांहीं कळत नाहीं ! ! कुणाला सांगूं हा आनंद ! आईऽऽ–केवढ्या मोठ्या माणसाची मुलगी आहें ग मी ! !–आई, कोणाला सांगूं ग हा मी आनंद आतां !–

**श्रीपत** : आनंद ! ! तीस हजार रुपये नाहींसे झाल्याचा आनंद !

**सरस्वती** : नाहींसे झाले ! तीस हजार रुपयांत कोटि रुपयांचा आनंद घरांत आला ! !

**श्रीपत** : वेड नाहीं ना लागलं तुला सरोज !

**सरस्वती** : ह्यालाच वेड म्हणत असतील तर मी वेडी–अगदीं वेडी झालें आहें ह्या क्षणीं ! ! लता ! ! लता ! ! ( तिला जवळ घेते आणि रडायला लागते. )

**श्रीपत** : रडायला काय झालं तुला !

**सरस्वती** : मी रडतें आहे ? छे छे ! माझा आनंद डोळ्यांतून बांध फोडून निघालाय, खरंच मला गावंसं वाटतंय–नाचावंसं वाटतंय्–हसावंसं वाटतंय्–रडावंसं वाटतंय्–ये लते, ये फुगड्या तरी घालूं या आपण–

**श्रीपत** : लता–जा बघूं तूं इथून–जा म्हणतों ना–( फुगड्या घालतांना लता थांबते व जाते. ) काय झालंय तुला सरोज ! सर्वस्वाचा होम केला तुझ्या बापानं–कुबेराचं भांडार पायाशीं आलं असतांना लाथाडलं–लक्ष्मीला पायदळीं तुडवली–

**सरस्वती** : काय बोलतां हें ? बाजारांतल्या लक्ष्मीला देव्हाऱ्यांत बसवलं त्यांनीं–

**श्रीपत** : तर ?

**सरस्वती** : नाहीं–तुम्हांला नाहीं कळणार हें ! सर्वस्वाचं समर्पण करण्यांत काय आनंद आहे–कसली धुंदी आहे हें कळायला एक तर तुम्हांला बायकांच्या जन्माला तरी यायला पाहिजे आणि पुरुष असलांत तर माझ्या बाबांचं आकाशाएवढं अंत:करण तरी तुम्हांला असायला पाहिजे ! माझे बाबा ! ! अडाणी–अशिक्षित, तुमच्या भाषेंत सांगायचं म्हणजे संस्कृतिशून्य–साधा रद्दीवाला ! ! आई गेली त्या वेळीं लताएवढी असेन मी–तेव्हांपासून जिवापाड जतन केलेल्या ह्या लेकीला तुमच्या स्वाधीन करतांना आपल्या काळजाचा तुकडा काढून त्यांनीं दिला–केव्हढी छाती ! माझं प्रेम तुमच्यावर आहे–हें किती भीत भीत सांगितलं होतं मीं बाबांना–मला वाटलं ते अडाणी आहेत–प्रेमबीम कांहीं कळणार नाहीं त्यांना असं वाटलं–वाटलं होतं कीं ते खूप रागावणार माझ्यावर–बाबांना मीं हें सांगितलं आणि हळूच घाबरून पाहिलं त्यांच्याकडे–त्यांनीं मला जवळ घेतलं आणि आनंदानं ते खूप रडले--लहानपणीं मी बाबांच्या कुशींत शिरून रडत असें, तसे ते अगदीं लहान लहान लहान होऊन माझ्या कुशींत तोंड खुपसून रडले ! त्यांना खूप आनंद झाला होता आणि खूप दु:ख झालं होतं–आज त्यांना खूप आनंद झालाय–नुसताच आनंद झालाय ! ! मलाहि झाला होता ! !–पण तुमच्याकडे पाहिलं आणि

आनंदाचा पूर ओसरला--आतां मला खूप वाईट वाटतं आहे—इतका वेळ आनंदानें रडलें—आतां दुःखानं रडावंसं वाटतंय—

**श्रीपत** : सरोज ! अग वेड नाहीं ना लागलं तुला ? आतां मात्र खरंच मला शंका यायला लागली आहे !

**सरस्वती** : वेड ?—मला खूप मोठं शहाणपण एकदम आलं आतां--म्हणूनच मला खूप वाईट वाटायला लागलं आहे.

**श्रीपत** : कशाबद्दल ?

**सरस्वती** : तुमच्या दुर्दैवाबद्दल !

**श्रीपत** : माझं दुर्दैव ?

**सरस्वती** : होय ! ! श्रीपतराव, केवढा आनंद आहे हो हा ! ! पण श्रीपतराव त्यांतला एक कण तुमच्या वांट्याला नाहीं आला ! तुमच्या पायांवर मीं माझं सर्वस्व वाहिलं त्या वेळीं मला मिळालेला आनंद—आज बाबांनीं हे तीस हजार रुपये देवाला खडीसाखरेचा नैवेद्य दाखवावा इतक्या सहजपणानं दवाखान्याला देऊन टाकतांना मिळवलेला आनंद—व्यवहारी धूर्त वाटणाऱ्या संभाकाकांनीं बाबांना लोटांगण घालतांना मिळवलेला आनंद—श्रीपतराव, ह्यांतला अर्धा कण जरी तुमच्या वांट्याला आला असता तर तुम्ही आनंदानं नाचलां असतां—बेहोष झाला असतां—बाबा—

( गलका ऐकूं येतो आणि रक्तबंबाळ अवस्थेंत लोक शिदबाला आणतात ) बाबा ! काय झालं हो संभाकाका—

**श्रीपत** : काय झालं हो—

**सरस्वती** : बाबा—

**संभा** : घाबरू नकोस पोरी— जा रे डाक्टरला आना लवकर.

**श्रीपत** : काय झालं हो ?

**सरस्वती** : बाबा— ( त्याला धरून चौपाईवर झोंपवतात. )

शिद्बा : ( क्षीण आवाजांत )– घाबरूं नको बेटा–

संभा : आम्ही इथून गेलों– गल्लीच्या नाक्याला पोहोंचलों– एक इसम आला– कसं काय शिद्बा म्हनाला– ह्यो त्याच्याशीं– " तुम्ही ! " यवढं बोलला आनि त्यानं " मीच " म्हनून सुरा मारला– बरं तर बरं छातींतच वार जायाचा–

सरस्वती : बाबा–

संभा : लोक धावल्यात त्याच्या मागं– आज आइतवार– दवाखाने बी बंद–

श्रीपत : मग इथं कां आणलंत ! ससूनमध्यें तरी न्यायचं–

संभा : अहो, तें काय सुचतं आम्हा अडान्यास्नी–

श्रीपत : थांबा– मी फोन करून येतों. ( जातो. )

शिद्बा : आका–

सरस्वती : काय बाबा–

[ लोक एका भणंग अवस्थेंतल्या इसमाला धरून घेऊन येतात– त्याचा एक हात श्रीपतनें धरला आहे. ]

श्रीपत : हा बघा सांपडला– मी खालीं उतरत होतों– लोक ह्याला धरून आणीत होते–

संभा : हाच त्यो– चांडाळा काय केलंस हें !

इसम : कोणी काय केलंय !

संभा : ( शिद्बा उठण्याचा प्रयत्न करतो, त्याला ) तू पड बघूं–

श्रीपत : थांबा– मी पोलीसना बोलावतों–

शिद्बा : ( कसाबसा उठून ) थांबा– हा नाहीं तो– ह्यानं कांहीं केलं नाहीं मला–

संभा : शिद्बा– अरं, असं काय करतोस !

श्रीपत : ( चिडून ) आतां मात्र कमाल झाली तुमच्यापुढें !

**सरस्वती** : काय पाहिजे बाबा—

**शिदबा** : ( अगदीं क्षीण आवाजांत ) हा इसम नाहीं तो— सोड त्याला—

**सरस्वती** : मी सांगतें हं बाबा ! सोडा त्यांना ! ! बाबा, तुम्ही स्वस्थ पडा. ते सोडतील त्यांना—

**श्रीपत** : अग पण—

**सरस्वती** : ( श्रीपतला ) पायां पडते तुमच्या— सोडा म्हणते ना त्यांना— ( लोक सोडतात ) कुणी तरी डॉक्टर कां नाहीं आणीत लवकर— बाबा—

( लता धांवत येते. )

**लता** : आजोबा !

**इसम** : लता !

**लता** : ( क्षणभर त्या इसमाकडे पाहून ) बाबा ! ( त्याच्या गळ्याला मिठी मारते. शिदबा पुन्हां कसाबसा उठून बसतो. ) आजोबा, बाबा आले— आजोबा—

**इसम** : आजोबा !

**संभा** : तू बा काय हिचा ! अर देवा ! शिदबा—

**इसम** : लता ऽ ऽ ! शिदबा— काय केलं मीं हें ( लोकांना ) माझा सुरा द्या मला— नाहीं तर तुम्ही तरी पोटांत खुपसा माझ्या—

**संभा** : अरं पोटच्या लेकीसारी तुझ्या पोरीला संभाळली होती ह्यानं— काय केलंस ह्यें !

**लता** : आजोबा— बाबा आले ! ! उठा ना— आक्का— उठव ना आजोबांना, बाबा तुम्ही उठवाना— ( शिदबा पुन्हां उठण्याचा प्रयत्न करतो. )

**सरस्वती** : बाबा—काय पाहिजे तुम्हांला—

**शिदबा** : लता— तुझे बाबा—

**लता** : होय आजोबा माझे बाबा ! ! छान आहेत नाहीं माझे बाबा !

( आपल्या बापाचा मुका घेते. ) माझे आजोबासुद्धां छान आहेत– माझी अक्का छान आहे–

**सरस्वती :** काका– डॉक्टर नाहीं का हो आले ?

**संभा :** घाबरू नको आक्का !–जरा रगात आलं तर इक्तं भ्यावं काय– मानसानं ! मी पटका बांदलाय जखमेवर वहायची नाहीं जखम– अरे का केलंस बाबा हें सारं !

**इसम :** काय सांगू– बायकोला बाळंतपणासाठीं दवाखान्यांत घेऊन गेलों होतों-- डॉक्टरीणबाई तसल्या तिच्या अडलेल्या अवस्थेंतसुद्धां पैसे मोजल्या-शिवाय दवाखान्यांत घेईना– माझ्या खिशांत तर फुटकी कवडी नव्हती– तसाच बाहेर पडलों– पुढ्यांत कुणाची तरी सायकल दिसली– ती चोरून विकावी म्हणून घेतली नी निघालों– इतक्यांत ह्यांनीं मला पकडून पोलिसांत दिलं– माझी बायको त्या दवाखान्याच्या दारांत रस्त्यांत तडफडून मेली– आज दोन महिन्यांनीं सुटून आलों– पोर नाहींशी झालेली– डोकंच फिरलं माझं आणि देवा काय करून बसलों मी– ( एकदम जाऊन शिदबाचे पाय धरतो. ) ( सरस्वतीस ) बाई, वरवंट्याखालीं ठेंचून काढा मला–

**शिदबा :** आका– भाऊ तुझा– पैसे दवाखान्याला–

**सरस्वती :** होय बाबा– भाऊ आहे माझा– तुम्ही पडा स्वस्थ– ( पाकीट घेते. ) मी नेऊन देईन पैसे–

**श्रीपत :** म्हणजे– काय माणसं आहेत– ह्या गुन्हेगाराला क्षमा करणार तुम्ही ? बाबासाहेब–

**सरस्वती :** दूर व्हा ! ! असल्या अडाणी माणसांच्या जगांत तुमच्यासारख्या सुसंस्कृत माणसाला जगणं अवघड जाईल ! ! इथलीं माणसं डोक्यानं जगत नाहींत; फक्त अंतःकरणानं जगतात ! ! हक्क आणि कायद्याच्या भाषेची पोपटपंची करणाऱ्या श्रीपतरावाची बायको होण्यापेक्षां माणुसकीची अडाणी

बोली जाणणाऱ्या रद्दीवाल्याची मुलगी म्हणून जन्मभर आनंदांत राहीन मी–

**श्रीपत** : सरोज ! !

**सरस्वती** : माझं नांव सरस्वती आहे ! ! बाबा ! !– ( शिदबाच्या पायांवर पडते. )

• • •

## याच लेखकाचीं इतर पुस्तकें

१. तुका म्हणे आतां

२. खोगीरभरती

३. अमलदार

४. नस्ती उठाठेव